


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

एप्रिल - २०१७



- वसंतराव पळशीकर : व्रतस्थ व समाजनिष्ठ विचारवंत
- अर्थशास्त्र व "२१ व्या शकातला मार्क्स" थॉमस पिकेटी
- शेती, शेतकरी आणि शासन - - लेखांक १३
- ग्युंटेर्ट आणि वैदिक दैवतशास्त्र
- जुने लेखन

अनुक्रमणिका








प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ७० । अंक ७। एप्रिल २०१७
चैत्र/वैशाख शके १९३८-१९३९
वार्षिक वर्गणी ४०० रुपये
या अंकाची किंमत रु. ४०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन - (०२०)२५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
नीता गायकवाड
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन - (०२१६७) २२०००६













अनुक्रमणिका

# नवभारत

## एप्रिल २०१७

## अनुक्रमणिका


**वसंतराव पळशीकर :**
**व्रतस्थ व समाजनिष्ठ विचारवंत** ३
किशोर बेडकीहाळ

**अर्थशास्त्र व "२१ व्या शकातला मार्क्स" थॉमस पिकेटी** १५
अशोक कृष्णाजी जोशी

**शेती, शेतकरी आणि शासन – लेखांक १३** २६
श्री. के. वनपाल

**ग्युंटेर्ट आणि वैदिक दैवतशास्त्र** ३१
गणेश उमाकांत थिटे

**जुने लेखन** ३५


अनुक्रमणिका

# वसंतराव पळशीकर :
# व्रतस्थ व समाजनिष्ठ विचारवंत

किशोर बेडकीहाळ

माझा आणि पळशीकरांचा संबंध ४३ वर्षांहून अधिक काळाचा आहे. ७२-७३ साली डॉ. नरेंद्र दाभोलकर यांच्या घरी त्यांचा परिचय झाला आणि इतका वाढला की, मी त्यांच्या परिवारातला एक माणूस होऊन गेलो. गेल्या ४३ वर्षांत अनेक दिवस, अनेक रात्री, अनेक शिबिरं, अनेक चर्चासत्रं, अनेक व्याख्यानं त्यांच्या समवेत झाली. निरनिराळ्या प्रश्नांवरची त्यांची चिंतन आणि मतं ऐकायला मिळाली. ब-याच प्रश्नांवर त्यांच्याशी चर्चाही करता आली. मी जो काही गिरगोटा अक्षरांच्या विश्वामध्ये केला त्याचं श्रेयसुद्धा पळशीकरांनाच आहे.

'समाजप्रबोधन पत्रिका' जेव्हा सुरू झाली, तेव्हा ते पहिले संपादक होते. त्यांनी अनेक नवे लेखक आणि समीक्षक समाजप्रबोधन पत्रिकेकतून पुढे आणले. डॉ. भास्कर लक्ष्मण भोळे यांनी वसंतरावांचे शब्दचित्र एका दिवाळी अंकात रेखाटले होते. त्यात त्यांनी लिहिले होते, 'हा लेखक घडवणारा संपादक आहे आणि मी स्वतः घडलो तो पळशीकरांच्या संपादकत्वाखाली घडलो.' पळशीकरही अशाच एका संपादकाच्या तालमीतून तयार झाले होते. ते म्हणजे राम पटवर्धन. मात्र विचारवंत म्हणून त्यांनी स्वतःच स्वतःला घडवलेले होते.

१८ फेब्रुवारी १९३६ रोजी त्यांचा हैद्राबादला जन्म झाला आणि शिक्षणही तेथेच सुरू झाले. नेहरूंच्या राजकारणाचे अभ्यासक म्हणून ख्यातकीर्त झालेले डॉ. न. गो. राजूरकर हे पळशीकरांचे महाविद्यालयातील मित्र होते. राजूरकरांच्या अनेक आठवणी वसंतराव सांगत असत. इंटरसायन्स पर्यंतचं त्यांच शिक्षण झाल्यावर त्यांनी शिक्षण सोडण्याचा निर्णय घेतला आणि त्यांच्या या निर्णयाला वडिलांनीही संमती दिली. वडिलांनी गांधींच्या चळवळीत काम केले होते. 'तुझ्या जबाबदारीवर तू शिक्षण सोड', असं वडिलांनी सांगितल्यावर त्यांनी स्वतःचा मार्ग स्वतः चोखाळायचा निर्णय घेतला. मग ते ठिकठिकाणी हिंडले. बाबा आमट्यांनी महाराष्ट्रामध्ये साधारण १९५१ साली काम सुरू केलं. तेव्हापासून वसंतराव बाबांबरोबर होते. त्यांचा बाबांबरोबरचा एक दुर्मिळ फोटो मी पाहिला आहे. पुढे ते ओरिसामध्ये कोरापुटला गेले. साधनेतही काही काळ त्यांची जा-ये होती. महाराष्ट्रात ते ५९ साली परत आले. त्याचवेळी त्यांनी लिखाण सुरू केले.

५९ सालचे सत्यकथेचे अंक आपण चाळले, तर त्यात त्यांची अनेक महत्त्वाच्या पुस्तकाची परीक्षणं प्रसिद्ध झालेली दिसतात. ही दीर्घ परीक्षणं त्यांनी वयाच्या २३ व्या वर्षी लिहिलेली आहेत. डॉ. बोरीस पास्तरनाक या रशियन लेखकाची 'डॉ. झिवॅगो' नावाची कादंबरी प्रसिद्ध होऊन वादग्रस्त झालेली होती. त्या कादंबरीला नोबेल पारितोषिक मिळाले होते. ते पारितोषिक स्विकारायला पास्तरनाकने जाऊ नये, अशी रशियन राज्यकर्त्यांची भूमिका होती. पळशीकरांनी त्या कादंबरीचं १९५९ च्या सत्यकथेच्या अंकात दीर्घ परीक्षण लिहिलं. महाराष्ट्रातील त्या वेळी गाजलेले लेखक चि. त्र्यं. खानोलकर यांची 'रात्रकाळी घागरकाळी' ही कादंबरी, श्री. ना. पेंडश्यांची 'रथचक्र' ही कादंबरी यांच्यावरही त्यांनी महत्त्वपूर्ण लेख लिहिले. पुढे 'सखाराम बाईंडर' या नाटकातील स्त्री पात्रांवरही उत्तम लेख लिहिला. नंतर मात्र त्यांनी समीक्षेकडे फारसे लक्ष दिले नाही. 'प्रतिष्ठान' या मासिकात त्यांनी काही लेख लिहिले होते.

यानंतर त्यांनी राजकीय, सामाजिक, आर्थिक आणि सांस्कृतिक प्रश्नांविषयी, चळवळींविषयी आणि मुख्यतः विचार प्रणालीच्या चिकित्सेविषयी लेख लिहिले. हे होण्याचे कारण हे दिसते की, ५९ साली ते महाराष्ट्रात आले त्याच्या आधी ५८ च्या ऑक्टोंबर मध्ये शंकरराव देवांनी पुण्यात एक बैठक बोलावली होती. त्या बैठकीला अ. भि. शहा, ग. प्र. प्रधान आणि देवदत्त दाभोलकर या तीन प्राध्यापकांना बोलावलं होतं. त्या वेळी

शंकररावदेवांनी सांगितले की, आता महाराष्ट्राचे स्वतंत्र राज्य निर्माण होईल. अशा वेळेला महाराष्ट्राच्या विचार विश्वामध्ये एक सांस्कृतिक आंदोलन तयार करावे लागेल. तिथलं विचारविश्व निकोप राहिलंच पाहिजे. ते चांगल्या पद्धतीनं विकसित व्हायला पाहिजे. त्यात अभिनिवेश असता कामा नये. सामान्य माणसाला शिक्षणाच्या रूपाने नवसाक्षरता प्राप्त होत आहे; त्यांना, त्यांच्या विचारांना दिशा मिळाली पाहिले. महाराष्ट्राच्या, भारताच्या सगळ्या प्रश्नांची चर्चा व्हायला हवी. या चर्चेतून 'समाजप्रबोधन पत्रिका' या नियतकालिकाचा जन्म झाला. वसंतराव ओरिसातून महाराष्ट्रात येण्याच्या थोडा काळ आधीच 'समाजप्रबोधन संस्था' आणि 'समाजप्रबोधन पत्रिका' निर्माण झाल्या होत्या. हे मासिक त्या वेळेस दर दोन महिन्यांनी निघत असे. समाजप्रबोधन संस्थेमध्ये देवदत्त दाभोलकर, भा. रां. भणगे, मे. पुं. रेगे, अ. भि. शहा, दि. के. बेडेकर व लक्ष्मणशास्त्री जोशी असे संचालक होते. पन्नालाल सुराणा समाज प्रबोधन संस्थेचे चिटणीस होते. जवळजवळ ६/७ वर्षे पळशीकर हे समाजप्रबोधन पत्रिकेचे संपादक होते. मला वाटतं की, त्यांच्या राजकीय, सामाजिक, आर्थिक प्रश्नांवरचं लेखन, चिंतन आणि विचारवंत म्हणून घडण होण्याची प्रक्रिया ही समाज प्रबोधन पत्रिकेतून सुरू झाली.

अभिनिवेशातून लेखन करायचं नाही, ही त्यांची मनोवृत्तीच होती. हे व्रत त्यांनी शेवटपर्यंत सांभाळले. शंकरराव देवांनी १९४७ साली 'नवभारत' सुरू केलं तेव्हा जी सूत्र घालून दिली होती तीच सूत्र समाजप्रबोधन पत्रिकेला त्यांनी घालून दिली. निकोप विचारविश्वाची सुरुवात मराठीत करणा-या नियतकालिकाचं संपादक पद पळशीकरांकडे वयाच्या अवघ्या ३० व्या वर्षी चालून आलं. १९६७ साली रशियन क्रांतीला ५० वर्षे झाली. तेव्हा वसंतरावांनी समाजप्रबोधन पत्रिकेचे दोन विशेषांक काढले आणि 'मौजे'ने त्यांचं ग्रंथात रूपांतर केले. या विशेषांकांचं आणि ग्रंथाचंही संपादन पळशीकरांनीच केलं होतं. त्या पुस्तकात लेनिन, स्टॅलिन, ट्रॉट्स्की अशा दिग्गजांवर चिकित्सापर लिखाण केलं होतं. ही त्यांची वैचारिक तयारी वयाच्या तिशी-एकतिशीत झाली होती. यानंतर २००४ सालापर्यंत म्हणजे सुमारे ४५ वर्षे, वसंतरावांची लेखणी अव्याहत चालू होती. त्यांच्या ५०० च्या वर लेखांची नोंद मी आणि समीर शिरपूरकर यांना मिळाली आहे. मी स्वतः त्यांच्या लेखांचे तीन खंड संपादित केले आहेत. त्यात जेमतेम ३६ लेखसुद्धा समाविष्ट झालेले नाहीत. ही तिन्ही पुस्तकं प्रत्येकी ३०० ते ३२५ पानांची आहेत. बाकीचे सगळे लेख जर संकलित करायचे झाले तर, डॉ. भोळ्यांनी असा अंदाज दिला होता की, जवळपास दहा-पंधरा खंड त्यांच्या लेखांचे होतील. इतकं अफाट लेखन केलेला हा विचारवंत होता.

त्याच्या लेखनाला जे सूत्र आहे ते त्यांचा स्वभाव, त्यांची विचारधारा, त्यांच जगणं, त्यांच लेखन यांच्याशी एकजीव झालेलं आहे. अत्यंत संवादी व्यक्तिमत्त्वाचा माणूस त्यांच्या लेखनाच्या शैलीतून आपल्याला दिसतो. व्यवहारात ते जगायचं तसंच ते लिहायचे इतकी अभिन्नता त्यानी साधली होती. नर्मविनोद, उपरोध, उपहास, असल्या कोणत्याही गुणांचा त्यांच्या शैलीवर चांगला किंवा वाईट परिणाम झालेला नाही. त्यांची शैली ही त्यांच्या स्वभावानुसार घडली आणि ती संवादी पद्धतीनेच व्यक्त झाली. याचं महत्त्वाच कारण त्यांची विचारप्रणाली. पळशीकरांविषयी स्थूलपणे ते गांधीवादी आहेत किंवा स्थूलपणे ते पुरोगामी विचारविश्वातले आहेत, एवढेच म्हणता येतं. एखाद्या ठाम विचारप्रणालीचं लेबल लावून त्यांना ते मार्क्सवादी होते, लोकशाही समाजवादी होते, हिंदुत्वावादी होते वा, अलीकडच्या भाषेत नवहिंदुत्ववादी होते असं ठरवता येत नाही. त्याचं महत्त्वाच कारण हे की, त्यांच्या वैचारिकदृष्टीतच शत्रुभावी विचार करणं या गोष्टीला त्यांनी फाटा दिला होता. हा कदाचित गांधींच्या संस्काराचाही परिणाम असेल. अमुक विरुद्ध तमुक अशा पद्धतीनं त्यांनी लेखन केलेलं नाही. कुठल्यातरी विचार प्रणालीला झोडपून काढायचं आहे म्हणूनही त्यांच लिखाण झालेलं नाही. जे जे लिहिता येईल ते लिहिलं आणि जे लिखाण समोर आलं त्याच्यावर प्रतिक्रिया देतानाही तो संवाद अधिकाधिक पुढे जाईल, चर्चा पुढे सरकेल या पद्धतीच्या लेखनाची त्यांची जातकुळी आणि शैली राहिली.

खरं तर पळशीकरांनी नवभारतामध्ये लिहलं, नवभारताचे अंक अधिक दर्जेदार कसे करता येतील व



अनुक्रमणिका

नवभारताचं अर्थकारण कसं मजबूत करता येईल. प्राज्ञपाठशाळेची पुस्तकं कशी चांगल्या दर्जाने निघतील यात लक्ष घातलं तसचं समाजप्रबोधन संस्थेच्या प्रकाशनांमध्येही लक्ष घातलं. पण हे करत असताना त्यांनी स्वतःची शैली आणि स्वतःचे मुद्दे सोडलेले दिसत नाहीत. या दोन्ही संस्थांमध्ये त्यांना स्थूलपणाने आपल्याशी समविचाराचे असणा-या पण तंतोतंत सारखी मतं नसणा-या अशा मित्रांशी मतभेद व्यक्त करावे लागले किंवा त्यांच्याबद्दल लिहावं लागलं. पण १९७० सालापासून त्यांनी एक पथ्य पाळलेलं दिसतं. ७० साली मौजेच्या दिवाळी अंकात 'मराठी विचारवंत आणि आपण' नावाचा एक परिसंवाद प्रसिद्ध झाला होता. त्याचं नंतर पुस्तकही प्रसिद्ध झालं. त्यात रेगे, प्रभाकर पाध्ये, शहा आणि पळशीकर यांचे लेख आहेत. आपल्या लेखात पळशीकरांनी म्हटलं होतं की, मराठीतील विचारविश्व पुढे जायचं असेल तर त्यात होणारी टीका सकस आणि निकोप असली पाहिजे. त्या वेळचा त्यांचा अनुभव आणि आज आपल्याला येणारे अनुभव फार वेगळे आहेत असे नाही. म्हणजे लेखकांचे कंपू असतात. प्रकाशकांचे कंपू असतात, टीकाकारांचे कंपू असतात, कोणत पुस्तक कोणी उचलून धरायचं, कोणी कुणाला फेवर करील हे आपल्याला त्या हिसंबंधांच्या आधारे सहजपणे सांगता येतं. एखादी व्यक्ती वागण्यात चुकली किंवा न चुकली हा वेगळा मुद्दा; पण विचार नीट पुढे जाणं महत्त्वाचं असेल, तर टीका करताना स्नेह या गोष्टीचा विचार टीकेच्या आड येता कामा नये आणि टीकेमुळे स्नेहातही अंतर पडता कामा नये. त्यामुळे ज्यांच्याशी त्यांचे वादविवाद झाले अशा सगळ्या लोकांशी त्यांचे संबंध स्नेहाचेच राहिले.

मी वरती असं म्हणालो की, ते ज्या काळात लिहिते झाले त्या दशकात कुठल्याही विचारप्रणालीशी त्यांनी स्वतःला जोडून घेतलं नाही. कारण कोणतही वास्तव कसं बघायचं याची त्यांनी एक शिस्त लावून घेतली होती. तुम्ही मार्क्सवादी असाल, तर सगळ्या वास्तवाकडे द्वंद्वात्मक विचारप्रणालीच्या अंगाने आणि वर्गसंघर्षाच्या अंगाने बघाल. समाजवादी असाल तर मार्क्सपासून थोडी फारकत घ्याल आणि त्या अंगाने बघाल वगैरे. वास्तव असेल तसे पाहण्यापेक्षा विचारप्रणालीच्या चष्म्यातून पाहणं ही गोष्ट त्यांना आक्षेपार्ह वाटत होती. वास्तव आहे तसं पाहू आणि मग निष्कर्षाकडे जाऊ. तथ्याकडून तत्त्वाकडे जाणे ही त्यांची भूमिका होती तत्त्वाकडून तथ्याकडे येणं त्यांना मान्य नव्हतं. मी अनेकदा त्यांच्याशी या मुद्द्यावर बोललो आहे. "तुम्ही असं का म्हणता? मार्क्सवाद्यांनी लिहलेली समीक्षा, मार्क्सवाद्यांनी केलेलं साहित्यसमीक्षण हे काही कमी दर्जाचं आहे का?" त्यावर ते म्हणाले, "ते कमी दर्जाचं असण्या-नसण्याचा हा मुद्दा नाही. तुम्ही एखाद्या विचारप्रणालीचा चष्मा लावून वास्तवाकडे बघायला लागता तेव्हा, मुळातच, लेखक म्हणून तुम्ही स्वतःवर बंधन घालून घेता. हे बंधन कोणतं? तर या चौकटीच्या बाहेर जायचं नाही हे ते बंधन आहे. पण ते जर वास्तव त्या चौकटीच्या बाहेर जात असेल, तर त्याबद्दल तुम्ही काय करणार? ते चौकटीत बसवण्याचा प्रयत्न करणार." या बाबतीत कुरुंदकरांनी श्रीपाद अमृत डांग्यांच उदाहारण दिलं होतं. 'भारतीय विवाह संस्थेचा इतिहास' या राजवाड्यांच्या पुस्तकाला डांग्यांची प्रस्तावना आहे. त्या प्रस्तावनेत डांग्यांनी असे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे की, राजवाडे मार्क्सच्या विचार पद्धतीने जात आहेत. प्रत्यक्षात राजवाड्यांची भूमिका वेगळी होती. ते काही एक वास्तव मांडत होते, काही प्रथा परंपरांबद्दल लिहित होते. तेव्हा असं वास्तव जर तुम्ही चौकटीत कोंबायचा प्रयत्न केलात, तर काही तरी विकृत तयार होतं आणि वास्तवाचं आकलन नीट होतच नाही. तेव्हा विचारप्रणालीचा चष्मा स्वीकारून तुम्ही चिकित्सा करायला बसता तेव्हा तुम्ही स्वतःवर काही बंधन घालून घेता. ही बंधनं लेखकाने स्वतःवर घालून घेऊ नयेत, अशा अर्थाचं लेखन स्वांतत्र्य पळशीकरांना अभिप्रेत होतं.

ते असं म्हणायचे की, लेखकाने प्रसंगी खरवडण्याची भूमिका ठेवली पाहिजे. खरवडून खरवडून जे वास्तव शिल्लक राहील ते त्याला नीट पाहता यायला पाहिजे. मग ते सामाजिक वास्तव असो किंवा साहित्यातलं वास्तव असो. साहित्यात ज्या प्रकारचं कल्पित वास्तव असतं त्याचं विश्लेषण तुम्ही तुमच्या जगण्याशी, अनुभवाशी किती प्रामाणिक राहता तितक्या प्रमाणात सकस होणार

आहे. तेव्हा विचारप्रणालीचा चष्मा न लावता वास्तव पाहण्याच्या त्यांच्या पद्धतीमुळे विशिष्ट विचारप्रणालीचे प्रवक्तेपण करणारे किंवा त्या भूमिकेतून लिहिणारे जे विचारवंत अभ्यासक होते. त्यांच्यापेक्षा पळशीकरांचे वेगळेपण उठून दिसत असे.

तथापि याचा परिणाम असा झाला की, त्यांची स्वतःची पठडी किंवा संपद्राय निर्माण झाला नाही. मार्क्सवाद्यांचा, समाजवाद्यांचा, गांधीवादांचा संप्रदाय दाखवता येतो. हे विशिष्ट पद्धतीने लिहिणारे लोक आहेत. त्यांची पठडी तयार होते. मग सांगता येतं हा माणूस कोणत्या पठडीतून लिहितो. तसं पळशीकरांबद्दल काही सांगता येत नव्हतं. तुम्हाला पळशीकरांची पठडी शोधायची असेल, तर पळशीकर बारकाईने संपूर्णपणे वाचले पाहिजेत. आपलं लेखन कोणत्या प्रकारचं आहे, हे ठरवण्यासाठी वाचकांवर आपलं सगळं लिखाण वाचण्याची जबाबदारी जो लेखक टाकतो त्याला सर्जनशील वैचारिक लेखक असं म्हणता येतं. केवळ अनुमान धपक्याने किंवा चार वाक्य वाचुन केलेल्या अनुमानाने पळशीकर कोणत्या प्रकारचे लेखक आहेत, हे सांगता येणार नाही.

विचारप्रणालीच्या चष्म्यातून लेखन करणं आणि चष्म्याच्या बाहेरील लेखन करणं हा जो फरक त्यांच्या लेखनात दिसतो त्याचा परिणाम असा झाला की, ते फक्त विचारवंतांच्या वर्तुळामध्ये एका अर्थाने सीमित झाले. आधुनिक अर्थाने ते लोकप्रिय विचारवंत होऊ शकले नाहीत. त्यांना अनुयायी मिळाले नाहीत, समर्थक मिळाले नाहीत आणि भक्त तर नाहीतच नाहीत. अलीकडच्या वैचारिक लेखनामध्ये आणि विशेषतः निरनिराळ्या बंडखोर लेखक विचारवंतांमध्ये आपल्याला असं दिसतं की, कुठल्यातरी चळवळीला ज्याचा हत्यार म्हणून वापर करता येईल असच लेखन हे लेखक करतात. एकदा हत्यार म्हणून वापर करायला तुम्ही लेखन केलत की, तुमच लेखन वाचणारा माणूस वाचक राहात नाही; तो एकतर तुमचा अनुयायी होतो किंवा भक्त होतो. असे विचारवंत समाजजीवनामध्ये निरनिराळ्या विचारप्रणालींच्या अस्मितासुद्धा बनू शकतात. त्या अस्मितावरून पुढे संघर्ष सुरू होतो. मग अमक्या विचारवंताबद्दल असं का लिहलं, तमक्या विचारवंताच्या विरोधात का लिहलं अशा चर्चेला वाव मिळतो. पळशीकरांच्या लेखनामध्ये असा वाव मिळण्याची शक्यता नाही, हे त्यांचे वेगळेपण आहे. पण ते नुसत वेगळेपण नाही ती मौलिक गोष्ट आहे. निकोप चर्चा विश्व पुढे जायचं असेल, तर त्यासाठी आवश्यक असणारी अशी त्यांची शैली आणि लेखन होतं. त्यामुळे ते लोकप्रिय विचारवंत झाले नाहीत.

दुसरा माझा अनुभव असा की, ते आणि त्यांचे लेखन हे निराळं करता येत नाही. तसच त्यांच्याशी संवाद करताना कसलही दडपण येत नाही. एवढ्या मोठ्या विचारवंताशी मी कसं बोलू, एखादा प्रश्न मी त्यांना कसा विचारू माझा एखादा लेख वाचाल का असं त्यांना कसं सांगू अस कुठलही दडपण त्यांच्याबरोबर बोलताना असत नसे. नरहर कुरुंदकर आणि पळशीकर या दोघांच माझ्यावर मोठं ऋण आहे. कुरुंदकर लवकर गेले, तरी देखील सात-आठ वर्षांच्या काळात माझा त्यांच्याशी पुष्कळ पत्रव्यवहार, गप्पा, चर्चा झाल्या. एक मोहक अशी त्यांची शैली होती ते तुम्हाला निरूत्तरच करून टाकायचे. संपल, आता हे अंतिम विधान आहे या धर्तीची त्यांची शैली होती. पळशीकरांकडे गेल्यावर असं लक्षात आलं की, त्यांनी कुरुंदकरांच्या काही पुस्तकांचं परीक्षण केलं होतं. मे. पुं. (रेगे) यांनी कुरुंदकरांच्या 'रूपवेध' या पुस्तकावर प्रदीर्घ व आक्रमक टीका करणारं परीक्षण लिहलं होतं. ते वाचलं आणि मी रेग्यांना म्हणालो कुरुंदकरांची एक पद्धत आहे आणि तुमची जी पद्धत आहे. त्यात हा फरक का दिसतो. ते म्हणाले की, ज्या वेळेला केवळ तर्काच्या आधारे तुम्ही अंतिम विधानापर्यंतची इमारत बांधता तेव्हा तुमचा तर्काचा पाया कच्चा असेल, तर ती इमारत कोसळायला वेळ लागत नाही. कुरुंदकरांच्या अशा अनेक गफलती फॅक्ट्स देताना झाल्या आहेत. तेव्हा अधिक फॅक्ट्स तपासून त्या फॅक्ट्सपासून सुरुवात करणं हे जास्त चांगलं आहे. कुरुंदकर नेहमी उलटच्या बाजूने, म्हणजे सिद्धान्ताच्या, सुरुवात करायचे आणि मग फॅक्ट्स त्या सिद्धान्तात बसवून दाखवण्याचा त्यांचा प्रयत्न असायचा.

मला पळशीकरांपासून काय शिकायला मिळालं असेल, तर वास्तव कसं समजून घ्याव, वास्तवातील

बदल कसे पहावेत, त्यातील तथ्यांश कसा मान्य करावा आणि तथ्यांश मान्य केल्यावर मतभेदाची सुरुवात करायची झाली, तर ती कोणत्या पद्धतीने करावी अशी एक मेथडॉलॉजी त्यांच्याकडून मिळवली. संपादक म्हणून अनेक लेखकांशी त्यांचा दीर्घकालीन पत्रव्यवहार होता. तो त्या त्या लेखकांनी दिला आणि प्रसिद्ध केला, तर मराठीतील एक चांगला दस्ताऐवज निर्माण होऊ शकतो. लेखकाने लिहिलेल्या लेखातलेच मुद्दे घेऊन पळशीकर त्यांना अस लिहायचे की, तुमच्या लेखाचं हे प्रतिपादन आहे, पण हे प्रतिपादन जर तुम्हाला यशस्वी करायच असेल, तर तुम्ही दिलेले पुरावे आणि उदाहरणे कच्ची वाटतात. ती पक्की केलीत तर पाहा; मी तुमच मत बदलू इच्छित नाही. तुमच मत तुम्ही मांडा, तुमचे निष्कर्ष तुम्ही मांडा, पण एक संपादक म्हणून मला असं वाटतं की, तुमच्या पुराव्यांचा तुम्ही या या पद्धतीनं फेरविचार करता आला तर करा. केलाच पाहिजे असं बंधन मात्र कधीच घातलं नाही. एका बाजूला लेखकाचं स्वातंत्र अबाधित ठेवायचं आणि दुस-या बाजूला अधिक चांगल्या दिशेने जाणारा लेख कसा होईल याच्या सूचना करायच्या अशी दुहेरी आस्था त्यांच्या पत्रव्यवहारातून दिसून येते. यामुळेच त्यांचा कोणाशीही संवाद होऊ शकायचा.

१९७७ साली जनता पक्ष सत्तेत आल्यावर 'संघ बदलला का?' याची मोठ्या प्रमाणावर चर्चा सुरू झाली होती. मी 'समाजवादी युवक दला'त काम करीत होतो. आमच्याकडे साप्ताहिक चर्चा असायची. त्या चर्चेत संघ बदलला की नाही यावर चर्चा होता होता संघटनेने माझ्यावर जबाबदारी टाकली की, मी लेख लिहायचा आणि आपण तो प्रसिद्ध करू. मी 'संघातील बदल सत्य की संभ्रम?' या नावाचा लेख लिहिला व तो 'माणूस' च्या ३० जुलै ७७ च्या अंकात प्रसिद्ध झाला. त्या वेळी माजगावकर म्हणाले, "लेख थोडा पुस्तकी आहे, पण चर्चेच्या दृष्टीने महत्त्वाचा आहे." तो लेख प्रसिद्ध झाल्यानंतर मला अनेक कार्यकर्ते, अभ्यासक, मित्र यांची पत्रं आली. त्या पत्रात सरळ म्हटलं होतं की, 'बरं झालं, तुम्ही चांगलं ठोकलंत', 'चांगला लेख तुम्ही लिहिला, विसंगती चांगल्या पॉईंटआऊट केल्या.' पळशीकरांच असं होत की, 'आत्तापर्यंत या विषयावर जी चर्चा मराठीत चालू आहे त्यात मला तुमचा लेख सरस वाटला. या विषयावर तुमच्याकडून दीर्घ लेखनाची मला उमेद आहे.' या पत्राने मी हरकलो आणि माझी उमेद वाढली.

पुढे साता-याला आल्यानंतर आमची दीर्घ चर्चा झाली त्याच्यातून एक पुस्तक तयार करावं अशी कल्पना आली. मग मी 'राष्ट्रीय स्वयंसेवक संघ : एक मागोवा' म्हणून हेडगेवार गोळवलकर, देवरस या सरसंघ चालकांच्या वैचारिक विश्वाचा मागोवा घेणारे पुस्तक तयार केले. त्यानंतर पळशीकरांनी मला खूप वेळ दिला. बेळगावच्या शिबिरात दहा दिवस एकत्र राहिलो, तीन दिवस साता-यात बसलो. पुस्तकातलं वाक्यन्‌वाक्य वाचणं, संदर्भ बघणं, त्यात काय चुकतं काय नाही, असं करत करत त्यांनी माझ्याकडून पुस्तक सुधारून घेतलं. ही जी त्यांची इतका वेळ देण्याची पद्धत आहे ती फार दुर्मीळ आहे. ते प्रसिद्ध कसं करता येईल याचीही व्यवस्था त्यांनी केली. पण ते जमलं नाही आणि पुस्तक बाहेर आलं नाही.

पळशीकरांच्या व्यक्तिमत्त्वाची दुसरी बाजू अशी की, त्यांनी श्रीयुत बी. आर. नंदा यांनी १९७८ साली लिहिलेल्या नामदार गोखल्यांच्या इंग्रजी चरित्राचं मराठी भाषांतर केलं. इंग्रजी चरित्र प्रसिद्ध झाल्याझाल्या ७८ सालच्या मौजे च्या दिवाळी अंकात त्यांनी त्या पुस्तकावर प्रदीर्घ लेख लिहिला होता. नंदांच्या पुस्तकाला पुरेपूर न्याय देणारा हा लेख होता. नंतर त्यांना वाटलं की, पुस्तकाचा मराठीत अनुवाद केला पाहिजे. त्यांनी स्वतःच ते काम हाती घेतलं आणि ५०० पानांचा अनुवाद लिहिला. त्या भाषांतराला त्यांनी प्रा. गो. म. कुलकर्णी यांची प्रस्तावना मिळवली आणि 'विश्वकर्मा'च्या माट्यांना ते पुस्तक प्रसिद्ध करायला लावलं. माटे आधीच आर्थिक अडचणीत होते. पण तरीसुद्धा त्यांनी ते पुस्तक काढलं. पळशीकरांनी लेखक धर्म म्हणून घरोघरी जाऊन ते पुस्तक विकण्याचा प्रयत्न केला. आपल्या शब्दामुळे प्रकाशकाने हे काम अंगावर घेतलं, पुस्तक मराठीतलं आणि महत्त्वाचं आहे, त्यामुळे ते खपवण्याची जबाबदारी आपली आहे असं त्यांनी मानलं, लेखकांना प्रोत्साहन देणं, प्रकाशकांना पुस्तक सुचवणं, स्वतः अनुवाद करणं, खपवायला मदत करणं असं चौफेर काम पळशीकरांनी

विचार विश्वामध्ये केलं.

'समाजप्रबोधन पत्रिका' सुटल्यापासून पुढे अनेक नियतकालिकातून आणि दिवाळी अंकातून त्यांनी लेखन केलं. या सर्व लेखनाचा उद्देश आधुनिकतेची चिकित्सा करणं हा होता. तो त्यांचा एक 'प्रोजेक्ट' किंवा 'प्रकल्प'च होता. या प्रकल्पाचे अनेक पैलू आहेत. त्या पैलूवरही त्यांनी लिहिलं. मार्क्सवाद, फुले आंबेडकरवाद, गांधी तत्त्वज्ञान, हिंदुत्व, पुरोगामी चळवळ त्या चळवळीतील वैचारिक भूमिका त्या सर्वांवर त्यांनी जे लिखाण केलं ते सगळं आधुनिकतेच्या चिकित्सेचा भाग म्हणून केला. या सर्व प्रश्नांची त्यांनी मुलगामी चिकित्सा केली.

अनेकांना हा प्रश्न पडतो की, त्यांनी मुलगामी चिकित्सा केली, म्हणजे नेमकं काय केलं? ते आधुनिकतेच्या विरोधात होते का? ते आधुनिकतेला वैचारिकदृष्ट्या विरोध करत होते ही गोष्ट खरी पण आधुनिकतेच्या सर्वच अंगांच्या ते विरोधात नव्हते हे लक्षात घेतले पाहिजे. पुर्णतः आधुनिक नसणारी आणि पुर्णपणे आधुनिकतेच्या विरोधातही नसणारी अशी त्यांची मधली भूमिका होती. त्या काळातलं मराठी चर्चाविश्व पाहिलं तर असं दिसतं की, शहा, रेगे, तर्कतीर्थ ही मंडही आधुनिकतेची एक भूमिका घेऊन उभी होती. विरुद्ध बाजूला आधुनिकतेच्या विरोधात, परंपरेचं नवीन परीष्करण करून एक घट्ट असं, वेगळं असं हिंदु राष्ट्र वेगळे करण्याची इच्छा बाळगणारा हिंदुत्ववाद तिस-या बाजूला कम्युनिस्ट, समाजवादी, शेकाप अशा पक्षांची डावी भूमिका होती. काँग्रेसचाही समावेश याच गटात केला पाहिजे कारण त्याकाळी काँग्रेसही डावीकडे झुकलेली होती.

आधुनिकता कुठल्या प्रकारची असो त्यातील समान व मूलभूत तत्त्व हे होते की, सर्व माणसे समान आहेत आणि माणूस हा विश्वाचा मानदंड आहे. येथून पळशीकर आपला मतभेद नोंदवायला सुरुवात करतात. सर्व माणस समान आहेत याला त्यांचा आक्षेप नाही तो माणसांनी केलेला नैतिक निवाडा आहे. पण आधुनिकतेनं माणसाला एक प्रकारचं दुभंगलेपण दिले आहे. आपल्याकडे या दुभंगलेपणाचा चांगला आविष्कार मर्ढेकरांच्या साहित्यात दिसतो. माणसांमध्ये दुभंगलेपण आहे. एकात्मतेची, एकत्वाची आणि समग्रतेची भावना आधुनिकतेत लोप पावलेली दिसते. तिथे क्षेत्रनिहाय गोष्टींना महत्त्व आलं आहे. एका विषयाचा अभ्यास अनेक अंगानी होऊ शकतो हे जसं आधुनिकतेचं वेगळेपण आहे तसंच प्रत्येक क्षेत्राचं नीतिनियमन त्याच्या त्याच्या पद्धतीनं होतं असंही आधुनिकता मानते. समग्रनीति नावाची गोष्ट नाही. त्यामुळे झाले काय की, प्रत्येक प्रश्नांवर निरनिराळी भूमिका घेणारे विचारवंत पुढे येऊ लागले आणि सगळ्या विश्वाकडे, प्रश्नांकडे समग्रतेने पाहण्याची भूमिका संपुष्टात आली. पळशीकरांची आधुनिकतेवरची टीका अशा प्रकारची होती.

पळशीकरांच्या आधुनिकतेवरील टीकेची दुसरी बाजू अशी होती. वैज्ञानिक चौकटीत जे ज्ञान इंद्रियगम्य आहे किंवा जे ज्ञान इंद्रियजन्य पद्धतीनेच अनुभवता येतं तेवढेच खरं, ही जी विज्ञानाची भूमिका आहे. ती पळशीकरांना मान्य नव्हती. आपल्याला असही दिसत की, दि. के. बेडेकरांसारख्या मार्क्सवादी विचारवंतानेसुद्धा आयुष्याच्या उत्तरार्धामध्ये जे धर्मश्रद्धेवरचं पुस्तक लिहलं त्यातही हाच विचार मांडला. नंतर नरेंद्र दाभोलकरांनी देखील बेडेकरांच्या भूमिकेला स्वीकृती दिली असं आपल्याला त्यांच्या 'तिमिरभेद' या पुस्तकातील अवतरणांवरून म्हणता येतं. पळशीकरांचा मुद्दा असा होता की, चराचर विश्वाशी आपण एकरूप असल्याची जी अनुभूती माणसाला येते ती तर्कातीत आहे. ती इंद्रियगम्य नाही. विज्ञानाच्या पद्धतीतून ती माणसाला मिळत नाही. म्हणून ती अनुभव पूर्व आहे (आ. प्रायोरी) असे गृहित धरावे लागते. हे एकत्व जर तुम्ही नाकारलं किंवा हे एकत्व मन आणि बुद्धी यांसारख्या इंद्रियांच्याद्वारे सिद्ध करायला गेलात तर ते सापडणार नाही.

हे सर्व सांगताना पळशीकरांचं गृहित काय होतं हे त्यांच्याशी बोलताना जाणवायचं. माणसाला अशा प्रकारच्या एकत्त्वाची एक आंतरिक ओढ किंवा गरज असते. म्हणून समग्रता किंवा श्रद्धेने मानलेली समग्रता हा त्याच्या जगण्याचा एक महत्त्वाचा भाग आहे. ही श्रद्धेची समग्रता आधुनिकतेच्या चौकटीत घडते आहे आणि त्यामुळे आधुनिकतेत नवे नवे प्रश्न निर्माण होतात. पळशीकरांनी युरोपात जी आधुनिकतेची प्रक्रिया घडली तिचं निरीक्षण










केलं. त्यातून त्यांच्या असं लक्षात आलं की, वसाहतीकरण, साम्राज्य या प्रक्रिया तिथल्या भांडवलशाहीने तिथल्या आधुनिकतेवर आरोपिल्या होत्या. भांडवलशाहीच्या चौकटीतल्या आधुनिकतेला व्यक्ती स्वतंत्र आहे, असं मानावं लागलं होतं त्याला महत्त्वाचं कारण होतं. मजूर हा भांडवलशाही उत्पादनातला महत्त्वाचा घटक आहे. सरंजामशाहीत हा घटक सरंजामदारांशी ज्या प्रकारे बांधील होता त्यातून तो मोकळा केल्याशिवाय भांडवलशाही पद्धतीचा विकास होऊ शकत नाही. म्हणून भांडवलशाहीने कल्पिलेल्या लोकशाहीत व्यक्तिस्वातंत्र्य, करार स्वातंत्र्य यांना महत्त्व आहे. मजूर भांडवलदाराशी करार करतो. असा करार करायला मजूर स्वतंत्र पाहिजे. म्हणून व्यक्तिस्वातंत्र्य महत्त्वाचं आहे. पण याचा अर्थ करार स्वातंत्र्यातून व्यक्तिस्वातंत्र्याची जपणूक होईलच असे नाही.

युरोपीय आधुनिकतेतुन भांडवलशाहीची प्रक्रिया सुरू झाली. विस्तारवाद, बाजारपेठेसाठीची आक्रमण यातून निर्माण झालेला साम्राज्यवाद हे भांडवलशाही प्रक्रियेचं एक रूप आहे. त्याचा प्रतिकार करता येईल. पण भांडवलशाहीचं दुसरं रूप उदारमतवादी लोकशाही हेही आहे ह्या उदारमतवादी लोकशाहीमागील प्रेरणा असं मानते की, व्यक्तिने अनियंत्रित रीतीने स्वातंत्र्य संपादन केलं तर त्यात काही गैर नाही. ह्या प्रेरणेमुळे स्वार्थ, लोभ त्यातुन निर्माण होणारी हिंसा अशा दुष्टचक्रात आधुनिक समाज अडकतो. ते व्हायला नको असेल, तर या दुष्टचक्राचा प्रतिवाद करावा लागेल. असा प्रतिवाद करणं म्हणजे आधुनिकपूर्व समाजाची सगळी रचना मान्य करणं असं नव्हे. तो प्रतिवाद केला पाहिजे बरोबर पण त्यासाठी आधुनिकपूर्व समाजाकडे जायला नको. मग या एकत्वाला आधार कोणता? तर ते एकत्व आपण गृहित धरायला पाहिजे त्याच्यासाठी एक सश्रद्ध मानस असलं पाहिजे. पळशीकर या दृष्टिकोनातून विज्ञान आणि तंत्रज्ञान यांचा मागोवा घेतात.

विज्ञानापासून मिळवलेले उपयोजित शास्त्र म्हणजे तंत्रज्ञान. अधिकाधिक तंत्रज्ञानाची निर्मिती करायची आणि माणसाच्या सुखसोयी वाढवायच्या हा आधुनिकतेचा महत्त्वाचा भाग आहे. कुठल्या तंत्रज्ञानापासून जर उपयोगी वस्तूचा उत्पादन झालेलं दिसलं नाही तर ते तंत्रज्ञान आपल्याला नको असतं. आपल्या समाजाला तंत्रज्ञानाचं आकर्षण आहे, विज्ञानाचं नाही हा त्यांचा पहिला मुद्दा होता. यातूनच आलेला दुसरा मुद्दा म्हणजे विज्ञानामध्ये विचार करण्याची एक तार्किक शिस्त आहे. ती सोडून आपण तंत्रज्ञानावर भर देऊ लागतो. त्यावेळी त्याचा अर्थ आपल्याला तंत्रज्ञान प्रधान समाज हवा आहे. परंतु वैज्ञानिक समाज मात्र नको आहे, हा अर्थ होय. तिसरी पायरी ही की, विज्ञानाच्या साहाय्याने माणूस प्रतिसृष्टी निर्माण करील. हे खरे परंतू तसे करताना या सृष्टीत अन्न साखळी, जैवसाखळी अशा ज्या स्वयंपूर्ण व्यवस्था आहेत त्यामध्ये हस्तक्षेप केला जातो. या हस्तक्षेपाचा परिणाम किती भयंकर होतो, हे भोपाळमधील वायुगळतीत जो हाहाकार झाला त्यावरून लक्षात येते. यावर पळशीकरांनी 'नवभारत' मध्ये एक लेख लिहिला होता. हे परिणाम टाळायचे असतील, तर आधुनिक जीवन शैली आचरणा-यांनी तिच्यावर कुठेतरी मर्यादा घातली पाहिजे. पळशीकरांच्या या युक्तीवादाचा प्रतिवाद करण्याचा प्रयत्न मराठीतील काही अभ्यासकांनी केला आहे. त्यांचं म्हणणं असं की, विज्ञान इतकं सक्षम आहे की, सध्याच्या घडामोडीतून निसर्गावर धोकादायक परिणाम करणा-या काही शक्ती निर्माण झाल्या, तरी विज्ञान आणि वैज्ञानिक आपल्या क्षमतेवर त्यावर उपाय शोधून काढतील. या युक्तिवादावर बोट ठेवून ते असे सांगत की, या विश्वासामध्ये आधुनिक चंगळवादाची बीज आहेत. काहीही बिघडलं तरी विज्ञान ते दुरुस्त करील ही भूमिका मुळात तंत्रज्ञान प्रणीत समाजाच्या चंगळ वादाच्या मुळाशी आहे.

पळशीकरांचं आणखी वैशिष्ट्य हे की, त्यांनी ज्या ज्या प्रश्नाची, विचारप्रणालींची चिकित्सा केली, तेव्हा तेव्हा त्यांचा मुख्य मुद्दा असा होता की, तुम्हाला कोणत्या प्रकारचा समाज हवा आहे आणि कोणत्या प्रकारचा समाज तुम्ही श्रेयस्कर मानता. जो समाज तुम्ही श्रेयस्कर मानता त्या समाजाची मूल्ये तुम्ही श्रेयस्कर मानलेली असतात. त्या मुल्यांना अनुरूप अशा रचना तुम्ही उभ्या करता का? त्या रचनांच्या आधारे समाजातील मानवी संबंध त्या मूल्यांना अनुरूप असे उभे करता येतील का? आजपर्यंत जगाचा जो प्रवास झाला होता तो

रचनांना अनुकूल अशी माणसं तयार करण्याच्या प्रकारचा आहे म्हणजे सरंजामशाही गेली आणि भांडवलशाही आली; भांडवलशाही गेली पण समाजवाद न येता नवभांडवलशाही व जागतिकीकरण आले. यातुन जे आर्थिक व्यवहार पुढे येत आहेत ते क्रुर हिंसात्मक अधिष्ठान असणारे, स्पर्धतून हिंसा निर्माण होईल अशा प्रकारचे आणि माणसामाणसातील संवाद नाहिसा करणारे आहेत. आज एका बदलेल्या सामाजिकतेला आपण तोंड देतोय. या नवीन व्यवस्थेत म्हणजे 'फिट बसलील अशी माणसं तयार करण्याचा प्रयोग आपण 'व्यक्तिमत्त्व विकास' या नावाखाली करतो.'

म्हणजे आपण पूर्वीचेच प्रघात पुढे नेऊन रचनेला अनुरूप अशी माणसे तयार करतो आहोत. पळशीकर याच्या उलट सांगत आहेत की, तुम्ही जे श्रेयस मानता त्या श्रेयसाशी सुसंगत अशी रचना उभी करा म्हणजे तुम्हाला योग्य वाटणारी मूल्य समाजात रूजतील. पळशीकरांच्या चिकित्सेचं वेगळेपण आहे ते त्यांनी श्रेयसाला जे प्राधान्य दिलं त्यात आहे. त्यावेळी अनेक छोट्या छोट्या संघटना काम करीत होत्या. त्या संघटनांची मुखपत्रं होती. त्या मुखपत्रातून त्यांच्या कार्यक्रमाची चळवळींची माहिती येत असे. त्यांची पळशीकर खूप बारीक पद्धतीने दखल घेत असत. 'तुम्ही हे जर म्हणत असाल आणि तुमची ही मूळ भूमिका असेल तर ह्यातून पुढे काय निघणार आहे'? हे प्रश्न विचारताना त्या मागे एक गृहीत कृत्य त्यांनी मानलेलं होतं. वैश्विकतेशी एकमत असलेला भारतीय समाज घडला पाहिजे या गृहीत कृत्यातून ते सर्व चळवळीकडे पहात.

म्हणजे आपण जे काही करीत आहोत त्यातून समाज एकत्र राहिल का; त्यात बंधूभाव वाढेल का, ही त्यांची काळजी असे. मराठवाडा विद्यापीठाचे कुलगुरू होण्याआधी शंकरराव खरातांनी एक पुस्तिका लिहिली होती. ती मध्ये त्यांनी दलितांसाठी वेगळ्या शिक्षणसंस्था, वेगळ्या शाळा, वेगळ्या वसाहती, वेगळं विद्यापीठ आणि याचा तार्किक परिपाक म्हणून निराळं दलित स्थान अशी मागणी केली होती. आंबेडकरांच्या काळात त्यांनीही एकदा अशी मागणी केली होती. रत्नागिरीजवळ त्या काळात अशा काही वसाहती निर्माण झाल्या होत्या. पण पुढे आंबेडकरांनीच ह्या भूमिकेचा आग्रह सोडला. खरातांनी स्वातंत्र्योत्तर काळामध्ये ही मागणी केली. त्यावर पळशीकरांनी पुस्तिका लिहून तिचा प्रतिवाद केला. त्या विषयावर ७४ साली सातारच्या बी. एड कॉलेजमध्ये एक चर्चासत्र ही झालं होतं. या पुस्तिकेतही पळशीकरांची भूमिका हीच होती की, या वेगळेपणातून तुम्ही काय साधणार? हा समाज तुम्हाला एकसंध ठेवायचा आहे की नाही? आणि समाज तर एकसंध ठेवायचा असेल तर सबंध देशाचा इतिहास, संस्कृती त्यातून निर्माण झालेली मानसिकता हा सगळ्यांचा सामाईक वारसा आहे हे मान्य केले पाहिजे. आपल्याकडच्या इतिहास लेखनात अलिकडच्या काळात असे सांगण्याचा प्रयत्न केला जातो की, 'हा इतिहास आमचा नाही, या इतिहासाचा आणि आमचा संबंध नाही.' पण आपण सगळे भारतातच राहणार आहोत. इतिहास तुमचा आमचा नाही तर भारताचा आहे. त्यात चांगले क्षण आहेत तसेच लाजिरवाणे क्षणही आहेत आणि ते सगळ्यांचेच आहेत, अशी भूमिका घेतली पाहिजे. लाजिरवाणे क्षण माझे नाहीत, चांगले क्षण माझे आहेत असं जर तुम्ही म्हणत असाल तर एकात्मतेची भूमिका इथे रुजणार नाही. ती रुजायची असेल तर जे काही आहे ते आहे, त्याची मी चिकित्सा करेन, त्यातील काय स्वीकारायचं ते मी ठरवीन; पण ही भूमी सोडून त्याच्या पलीकडे मला अस्तित्व असत नाही, अशी भावना बाळगली पाहिजे.

एकात्म समाज, एकात्म राष्ट्र हे गृहीत धरून इथल्या सामाजिकतेची चिकित्सा पळशीकरांनी केली तशीच त्यांनी राष्ट्रवादाची चिकित्साही केली. राष्ट्रवादाचा विचार भारावल्या अवस्थेतून बरेचदा केला जातो. राष्ट्र आणि राष्ट्रवाद या दोन्ही कल्पना आपल्याला 'थ्रिल' आणणा-या वाटतात. कारण आपण फार रोमँटिक पद्धतीने त्यांचा विचार करतो. दुसरी आपली समजूत असते की, राष्ट्र नावाची रचना अनादि काळापासून चालत आली असून अनंत काळापर्यंत चालत राहणार आहे. पाश्चात्त्य अभ्यासकांनी ही समजूत उडवून लावलीच होती. पळशीकरांनी मराठीत या भूमिकेला छेद दिला. या विषयीच्या त्यांच्या लेखातील पहिलेच वाक्य असे आहे की, 'पृथ्वी भूपृष्ठाची आज राष्ट्रांमध्ये वाटणी झालेली आहे.' पुढे

अनुक्रमणिका

त्यांनी किती राष्ट्रे नव्यानं निर्माण झाली; राष्ट्रांच्या सरहद्दी किर्तीदा बदलल्या हे तपशीलाचा भाग म्हणून लिहिले आहे. मूळ प्रमेय काय होतं की, पारंपरिक राष्ट्रवाद आपल्याला सोडला पाहिजे. वैदिक संस्कृतीमधील 'वसूधैव कुटुंबकमं' ही तुमची आदर्श भूमिका असेल, तर वैश्विक राष्ट्रवादाशी आपला राष्ट्रवाद जोडता यायला पाहिजे. म्हणन धर्म, जात, भाषा, संस्कृती यावर आधारलेला राष्ट्रवाद असता कामा नये. यात काही नवीन होत नाही; राष्ट्रवादी चळवळीतून आणि स्वातंत्र्य लढ्यातून हेच प्रतिपादन मांडल गेलं होतं.

पळशीकरांचा पुढचा मुद्दा असा की, सांस्कृतिक अस्मिता, जातीय अस्मिता हे समाजातील संघर्षाचे बिंदु आहेत. त्यामुळे पळशीकरांना जी राष्ट्रवादाची भूमिका अभिप्रेत आहे ती अशी की, रामायण, महाभारत, भगवत्‌गीता यासारखे प्राचीन ग्रंथ किंवा काव्ये ही कोणत्याच लायकीची नाहीत आणि त्यांच्यात मला काडीमात्र रस नाही असं म्हणणारी व्यक्तिसुद्धा अस्सल भारतीय व राष्ट्रवादी असू शकते. हे जर तुम्ही म्हटलं नाही, तर तुमच्या राष्ट्रवादामध्ये विचार स्वातंत्र्याचा लोपच होण्याची शक्यता आहे आणि तो हिंसकही होईल. या संबंधात टागोरांची राष्ट्रवाद विषयक भूमिका त्यांना आदर्श वाटत होती. त्यावर त्यांनी लिहिलेले आहे. टागोर सांगतात की, राष्ट्रवादाची जातकुळी महत्त्वाची आहे. तुम्ही राष्ट्र निर्माण केलंत, भारतीय नावाची एक आयडेंटीटी निर्माण केलीत. भारतीयांच्या तमिळी, पंजाबी वगैरे ओळखी तुम्ही दुय्यम ठरवल्यात. त्याच्या खाली धर्म, त्यांच्या खाली जाती अशी रचना तुम्ही केलीत, हे बरोबर, पण राष्ट्र टिकवण्याचे अधिष्ठान काय? केवळ समान परंपरा, समान इतिहास, समान अस्मिता हे मुद्दे राष्ट्र टिकवत नाहीत. ते फारफार तर राष्ट्राच्या बळकटीला मदत करतील. पण एकत्वाची ओढ आणि एकत्र राहण्याची अनिवार्य इच्छा या गोष्टींशिवाय राष्ट्र उभंच राहू शकत नाही. टागोरांचं हे प्रतिपादन पळशीकरांनी मराठीमध्ये अतिशय जोरकस पणाने मांडले.

पारंपरिक राष्ट्रवादापासून लांब रहायचं म्हणजे काय ते सांगताना पळशीकर असं म्हणाले की, राज्यशास्त्रामध्ये, समाजशास्त्रामध्ये राष्ट्र ही एक कल्पना मात्र आहे. त्याप्रमाणे आत्तापर्यंतचा जो राष्ट्रवाद आहे त्यानुसार राष्ट्राला एक कल्पित शत्रूदेखील लागतो. सध्या आपल्यापुढे पाकिस्तान हा शत्रू आहे. पुर्वी म्हणजे ६०-६२ च्या दरम्यान चीन हा शत्रू होता. परंतु एखादा शत्रू मानून राष्ट्रीयत्वाची जाणीव चिरस्थाई आणि कायम स्वरूपात टिकायची नाही. तर माझं राष्ट्र आज आहे आणि आजच्या या चौकटीमध्ये, सरहद्दीमध्ये राहणारे सगळे भारतीय आहेत. त्यातले काही वागण्यात चुकत असतील, काही प्रश्नांवर त्यांचे विचार वेगळे असतील तरीही ते सर्व भारतीय आहेत. ही मुळात मान्यता असेल तरच भारतीय राष्ट्राचा नीटपणे विचार करा. सध्या आपण राष्ट्राचा विचार कंडीशनल पद्धतीने करतो. म्हणजे उदा, अमुक एका सामाजिक घटकाने पाक विरुद्ध सर्जिकल स्ट्राईक केल्याबद्दल मोदींचं अभिनंदन केलं का? किंवा पाकिस्तानने हल्ला केल्यानंतर पाकिस्तानचा निषेध केला का; या प्रकारच्या अटीवर एखाद्या घटकाची राष्ट्रीयता मोजणं हेच त्यांना (पळशीकरांना) मान्य नाही. हे सगळे लोक माझे आहेत आणि ते माझे असण्याची भूमिका घेता का? हा प्रश्न त्यांनी आधुनिक राष्ट्रवादाला विचारला होता. पारंपरिक राष्ट्रवाद या अर्थानं बाजूला टाकता का? इथल्या अनेक परंपरा मला मान्य नाहीत, इथले अनेक विचारवंत आणि त्यांची वैचारिकता मला मान्य नाही, इथल्या धर्मग्रंथांना माझा विरोध आहे, तरीही मी राष्ट्रीय असू शकतो की नाही? या प्रश्नापासून त्यांनी राष्ट्रवादाची नवी चर्चा उपस्थित केली होती. हे त्यांचे वेगळेपण आहे.

हिंदु-मुस्लिम प्रश्नांच्या चिकित्सेमध्ये सुद्धा पळशीकरांचे वेगळेपण दिसून येतं. हमीद दलवाई, अ. भि. शहा आणि नरहर कुरुंदकर हे मुस्लिम प्रश्नांचे मराठीतील दिग्गज अभ्यासक मानले जातात. त्यांच्या भूमिका संदर्भात पळशीकरांनी आपल्या लेखनाचं टीकाविश्व उभं केलं. या तिघांचे काही मुद्दे त्यांनी मान्य केले. पण त्या पलीकडे कसं जायला पाहिजे आणि त्याच्यातून काय काय होऊ शकतं याचा अंदाज बांधणारं लेखन केल्यामुळे पळशीकरांना अप्रियता पत्करावी लागली. वरील तीन लेखक अतिशय तर्कशुद्ध पद्धतीनं इस्लामच्या जातियवादाचा आणि फुटीरपणाचा मुकाबला करत










असतील, तर तुम्ही त्यांच्यावर टीका का करता असा प्रश्न तेव्हा उपस्थित व्हायचा. पण मुख्य प्रश्नांच आकलन वेगळ्या पद्धतीनं मांडण हे जर महत्त्वाचं असेल, तर त्या विचारवंतांच्या लिखाणाची चर्चा व चिकित्सा होणारच. त्यामुळे असा प्रश्न उपस्थित करणं हे अप्रस्तुत आहे. एका बाजूला हिंदुत्ववाद्यांनी या तिघांना उचलून धरलेलं आहे. त्यामुळे असा समज होतो की, शहा, दलवई, कुरुंदकर यांची मुस्लिम प्रश्नांची चिकित्सा ही हिंदुत्ववाद्यांना संघटनात्मक बळ देते. अशा आशयाचं लेखन स. ह. देशपांडे यांनी केलेलही आहे. या तिघांनी हिंदुत्वाला अधिष्ठान पुरवलं हा हिंदुत्व वाद्यांचा दावा पळशीकरांनी खोडून काढला.

या तिघांच्या लेखनामुळे मुस्लिम समाजाबद्दल कोणते प्रश्न तयार होतात आणि कोणत्या प्रतिमा तयार होतात यावर पळशीकरांनी भर दिला आहे. शहांवर लिहिताना त्यांनी असं म्हटलं आहे की, सबंध मुस्लिम समाजाला आरोपीच्या पिंज-यात उभे करून जर त्याची चिकित्सा करणार असाल, तर ती चिकित्सा परंपरेची न होता. माणसांची होईल. कुरुंदकरांचा एक लेख आहे. त्यात ते म्हणतात की, 'मी भारतीय मुस्लिमांशी चर्चा करायला तयार आहे. पण आधुनिक राष्ट्राचे घटक म्हणून ती चर्चा होईल.' इथे घोटाळा असा की, मुस्लिम समाज राष्ट्राशी समरस होत नाही किंवा इस्लामची वैचारिक भूमिका राष्ट्र या कल्पनेला अनुकूल नाही अशी वैचारिकता गृहीत धरून तुम्ही इस्लामची चिकित्सा करता आणि त्या चिकित्सेतून मुस्लिम आमच्याबरोबर नाहीत ही तुमची तक्रार निष्पन्न होते. पळशीकराचं साधं म्हणणं असं होतं की, तुमचे काय आक्षेप असतील ते असूद्यात, पण पहिल्यांदा त्यांना आमचे म्हणा. भारतीय राष्ट्राचे मुस्लिम हे नागरिक नाहीत अशी तुमची तक्रार आहे आणि ही तक्रारच तुम्ही चर्चेसाठी अट म्हणून मांडता आहात असे केले, तर चिकित्सा आणि चर्चा पुढे जाऊच शकणार नाही. पळशीकरांनी शहा, दलवई आणि कुरुंदकर यांच्या लिखाणाचे जे विश्लेषण केले त्यात हा बारकावा होता.

६७ साली भिवंडीत हिंदु-मुसलमानांचा मोठा दंगा झाला. त्यावर लोकसभेतही चर्चा झाली. त्यामध्ये वाजपेयींनी एक लढाऊ भाषण केलं होतं. 'आता हिंदु मार खाणार नाहीत' या नावाची त्या भाषणाची पुस्तिका भारतीय जनसंघाने प्रसिद्ध केली. वाजपेयींनी 'आता हिंदु जागा झाला आहे, तो मार खाणार नाहीच पण आणखीन मार देईल' असा इशारा दिल्याचा डांगोरा तेव्हा पिटला जात होता. वाजपेयींचे हे भाषण आणि दंग्याचे स्वरूप व भीषणता लक्षात घेता त्या वेळच्या वातावरणात मुस्लिम विरोधांचा विखार तयार झाला होता. 'याला तुमच्याकडे काय उत्तर आहे?' असा प्रश्न पुरोगामी विचारविश्वाला त्यात कळत नकळत केला गेला होता.'

पळशीकरांनी समाजप्रबोधन पत्रिकेत लेख लिहून त्याला उत्तर दिलं. समाजप्रबोधन संस्थेने त्या लेखाची पुस्तिका तयार करून फक्त १० पैसे किंमतीत चर्चा मंडळांना पुरविली होती. 'वाजपेयी आणि फुटिर जातिवादाचा मुकाबला' असं त्याच शीर्षक होतं. हिंदु-मुस्लिम प्रश्नांचे सगळे पदर त्यांनी व्यवस्थित उगडून दाखवले होते. कॉंग्रेसच्या चुका कोणत्या झाल्या यांची सम्यक चिकित्सा करून कॉंग्रेसच्या चुका दाखवल्या होत्या. पुरोगामी चुकांवरही बोट ठेवलं होतं. तसेच हिंदुत्ववाद्यांचेही दोष दाखवले येते.

लेखाच्या शेवटी त्यांनी वाजपेयींबाबत असं म्हटलं होत की, 'वाजपेयींनी आता हिंदू मार खाणार नाहीत एवढच म्हटलं. हिंदू अधिकाधिक मार देतील असं म्हटलं नाही. वाजपेयींच्या भाषणात असा उल्लेख होता की, भिवंडीमध्ये जे घडलं त्यात सगळ्यात जास्त नुकसान मुस्लिम भाईंच झालं. याचा अर्थ प्रतिकाराच्या रूपाने का होईना हिंदुनीच (मुसलमानांना) भरपूर मार दिला आहे आणि आता तो समाज सांगतो आहे की, आम्ही मार खाणार नाही. तेव्हा ही पहिली विसंगती वाजपेयींच्या भाषणात होती. शेवटी पळशीकरांनी लिहलं होतं की, 'वाजपेयींनी या प्रकारची भूमिका सोडून सामंजस्याची भूमिका घेतली, तर वाजपेयी कदाचित त्यांच्या पक्षात अप्रिय होतील. पण देशाचे नेतृत्व करण्याला लायक ठरतील. आपण पाहिलेच की, देशाचे नेतृत्व वाजपेयींकडे आले, तेव्हा त्यांना ही आक्रमक भूमिका बाजूला ठेवावी लागली. पळशीकरांनी नेहरूविषयी लिहिताना ही भूमिका घेतली होती. नेहरूंच्या सगळ्या धोरणांशी पळशीकर

सहमत नव्हते. पण तरी त्यांनी लिहल की, नेहरूंसारखा पंतप्रधान या देशाला मिळाला हे या देशाचं भाग्य आहे; ज्या दिवशी भारतीय जनता नेहरूंना विसरेल त्या दिवशी या देशाची धर्माधिष्ठित राज्य व्यवस्थेकडे वाटचाल सुरू होईल. मला वाटतं. आज ते आपल्या अनुभवाला येत आहे. नेहरूंचा वारसा जाणीवपूर्वक सोडून द्यायचा आहे आणि एका वेगळ्या 'मेजॉरिटेरियन नॅशनॅलिझम्'कडे आपण चाललो आहोत. त्याची सूचना नेहरूंवरच्या पळशीकरांच्या लेखातून मिळते.

पळशीकरांनी धर्मविषयक भूमिकांची जी चिकित्सा केली. त्यात धर्माधर्मात किंवा पंथात कोणताही भेदभाव केला नाही. त्यांनी सगळ्यांचीच कठोर तपासणी केली. रेग्यांनी फादर दिब्रेटो वर खूप कठोरपणे लिहलं होतं. दिब्रेटोनी त्याला नवभारतामध्ये उत्तर दिलं त्या उत्तरांवरही पळशीकरांनी त्यांच्या संवादी पद्धतीने आवर्जून लिहलं. त्यांच म्हणणं असं होत की, कठोर चिकित्सा करताना तुम्ही कुठल्याही बाजूने पक्षपात केलात, तर त्याचा परिणाम इष्ट होणार नाही. ह्याच विचारसरणीतून संबंध पुरोगामी विचारविश्वामध्ये हिंदू समूहाबद्दल जे जे म्हटलं गेलं होतं त्याचा विचार करून त्यांनी निष्कर्ष काढला होता की, तुम्ही हिंदू म्हणून प्रत्येक वेळेला बडवायला लागलात, तर आज ना उद्या त्याची 'रिॲक्शन' येईल आणि ती तुम्हाला संपवून टाकेल. तेव्हा तारतम्याने धर्मश्रद्धांबद्दलच्या भूमिका विकसित कराव्या लागतील हे करताना हिंदू विरुद्ध मुसलमान असा प्रश्न आला की, हिंदुंच सगळं चुकलं, दलितविरुद्ध सवर्ण असा प्रश्न आला की, सवर्ण असा प्रश्न आला की, सवर्णाचं सगळं चुकलं या पद्धतीनं तुम्ही विचार करत असाल, तर तो विचार फलदायी होणार नाहीच, पण एकात्म समाजाच्या दिशेनेही जाणार नाही.

हल्ली पर्यायी विकास नीती हा नवा विचार आपल्याला माहित झाला आहे. पण ८० च्या आसपासचं पळशीकरांच लिखाण पाहिलं, तर आपणास दिसून येतं की, अशाच प्रकारची भूमिका त्यांनी तेव्हा मांडली होती. पर्यायी विकास नीती ही अचानक उत्पन्न झालेली विचारधारा नाही. पळशीकरांनी मार्क्सच्या, गांधींच्या आणि फुल्यांच्या लेखनात या नीतीची बीजे कुठे दिसतात, ते शोधण्याचा प्रयत्न केला. तो किती यशस्वी झाला ते वाचक म्हणून आपण ठरवायचे आहे. ह्यात लक्षात घेण्याजोगं हे की, अशा विचारवंतांकडे पाहण्याची एक नवी दृष्टी पळशीकरांनी विकसित केली. विचारवंत त्याच्या काळामध्ये तेव्हा निर्माण झालेल्या प्रश्नांच्या संदर्भात लिखाण करीत असतो. त्या संदर्भाचा प्रथम अभ्यास करायचा. मग तो अभ्यास आजच्या वास्तवापर्यंत आणून भिडवायचा. त्यातून आत्ता उपकारक ठरणारी जी बीज असतील ती घेऊन आपण पुढचा विचार विकसित करायचा ही ती दृष्टी होईल. मार्क्स, गांधी, फुले, आंबेडकर यांच्या विचारसरणीची पळशीकरांनी पायाभूत पद्धतीने केलेली चिकित्सा या दृष्टीने पाहण्याजोगी आहे.

उदारमतवादी लोकशाहीचे त्यांनी केलेले विश्लेषण आपल्यासाठी सर्वात महत्त्वाचं आहे असं मला वाटतं. आणीबाणीची थप्पड आपल्याला इंदिरा गांधींनी मारली आणि जागं केलं. पण त्याची मूलभूत मीमांसा आपण केलीच नाही. ७७ साली जनता पक्षाला विजय मिळाला म्हणजे आता लोकशाही भारतात चिरस्थायी झाली. असा भ्रम आपल्याला झाला. नंतर लोकशाही विषयक चिंतनाचा आपण लोपच केला. खरं तर आणीबाणीपासून पळशीकर आपल्याला सातत्याने सांगत आले की, इंदिरा गांधींनी उभ्या केलेल्या आव्हानाला कमी लेखण बरोबर नाही. या आव्हानात अनेक गोष्टी दडलेल्या आहेत. इथल्या 'नाही रे' वर्गाची घडण 'आहे रे' वर्गातील आंतर विरोध ह्यांची नीट माहिती घेतल्याखेरीज या आव्हानाची चिकित्सा करता येणार नाही. आजच्या लिबरल डेमॉक्रसीला तुम्ही आयडियल डेमॉक्रसी मानताय; पण या लिबरल डेमॉक्रसीच्या केंद्रस्थानी स्पर्धा आणि हिंसात्मकता असू शकते हे तुम्ही लक्षात घेत नाही. समाजाच्या विविध घटकांचे हितसंबंध त्यांच्या बलाबलाने आपोआप नियंत्रित होतील आणि समतोल प्रस्थापित होईल हे खरं नाही. पाश्चात्त्य देशातही असं झालं नाही तरी ते तुम्ही गृहीत धरताय. लोकशाहीचा विचार करायचा असेल, तर एका अंगाने सिव्हिल सोसायटीचा मुद्दा महत्त्वाचा ठरतो; दुस-या बाजूने मला इतरांशी देणघेणं नाही ही तुमची भूमिका सुटली नाही, तर सुदृढ लोकशाही आपण उभी करू शकत नाही.

इथला समाज निरनिराळ्या गटात विभागलेला आहे. प्रत्येक गट आपल्या पद्धतीने लोकशाहीचा विचार त्याला पेलवेल तितक्या प्रमाणात करतो. ज्या दिवशी तो विचार पेलवला नाही त्या दिवशी तो लोकशाहीची भडदास्त ठेवत नाही. इंदिरा गांधींनी हेच केलं होतं. पळशीकरांनी ही एक लोकशाहीची वेगळी चिकित्सा केली होती. उदारमतवादीच्या पुढे जाणं आणि ख-या लोकशाहीच्या दृष्टीने विचार करणं, त्या लोकशाहीत नागरिकत्व, हक्क, कर्तव्य यांच स्थान काय याची चर्चा करणं हे पळशीकरांना महत्त्वाचं वाटत होतं. हक्क मागत असताना काहीच नुकसान नसतं असं ते म्हणतात. हक्क पदरात पडल्यानंतर तुम्ही कोणत्या ना कोणत्या हितसंबंधी गटामध्ये सामील होता. परंतु तुम्ही जेव्हा कर्तव्य करता तेव्हा तुम्ही ख-या अर्थाने लोकशाही प्रक्रियेत सहभागी होत असता असं त्यांचं म्हणणं होतं. या निमित्ताने त्यांनी कर्तव्याला बांधील असणा-या नागरिकत्वाच्या विकसनाची चर्चा केली. या चर्चेला उदारमतवादी लोकशाहीच्या चिकित्सेचा संदर्भ होता. खूप गंभीरपणे, व्रतस्थ पद्धतीने समाजाला मार्गदर्शन करणं, समाजातील विविध गटांच्या हितसंबंधाच्या बाहेर राहून निर्भिडपणे मार्गदर्शन करणं, त्याच्याबदल्यात कोणत्याही मानसन्मानाची अपेक्षा न ठेवणं असे सगळे नियम संभाळून स्वतःच जीवन घडविणा-या विचारवंताला गं. बा. सरदारांनी नैष्ठिक विचारवंत अशी उपमा दिली होती.

त्या नैष्ठिक विचारवंताच्या चौकटीमध्ये बसणारे पळशीकर हे महत्त्वाचे विचारवंत होते. ४०-४५ वर्षे त्यांनी या समाजाला मार्गदर्शन केलं. अनेक कार्यकर्त्यांना आणि अभ्यासकांना त्याचा उपयोग झाला. अनेक लेखक घडले, संपादक घडले, एवढं योगदान करणारा माणूस आपल्या वाईसारख्या शहरात शेवटी वास्तव्याला आला. बराच काळ त्यांनी नवभारतामध्ये काम केलं. मराठी विचारविश्वाला एक समृद्धी दिली, मी त्यांना श्रद्धांजली वाहतो.

ᏇᏇᏇ

अनुक्रमणिका

# अर्थशास्त्र व "२१ व्या शतकातला मार्क्स" थॉमस पिकेटी

अशोक कृष्णाजी जोशी

(१)

माणूस आर्थिक कृती कशी करतो. त्याचे अर्थकारण कसे असते; म्हणजे पैशाचे नियोजन तो कसे करतो; अर्थशास्त्र म्हणजे काय या प्रश्नांचा अभ्यास नीटपणे आधुनिक काळात १८ व्या शतकात सुरू झाला याचे मुख्य कारण म्हणजे माणसाची उत्पादनपद्धती व उपभोगपद्धती याच अठराव्या शतकातल्या औद्योगिक क्रांतीच्या काळात बदलली. त्याआधीचा अर्थविचार हा शेतीनिष्ठ अर्थव्यवस्थेशी संबंधित होता. जगातल्या अनेक संस्कृतीत तसा अभ्यास केला गेला होता. पण त्याचा संदर्भ शेतीनिष्ठ समाजव्यवस्थेचाच होता. तीच अर्थव्यवस्था त्या जुन्या काळी सर्व जगात प्रचलित होती. औद्योगिक अर्थपद्धती कुठेच अस्तित्वात नव्हती.

पण अर्थशास्त्राचा सर्वसामान्य नियम त्या वेळीही लागू पडत होता हे त्याच बरोबर खरे आहे. माणसाची आर्थिक कृती त्याच्या आर्थिक निवडीशी संबंधित असते व आर्थिक निवड म्हणजे माणसाच्या अमर्याद गरजा व इच्छा आणि त्याची मर्यादित अर्थसाधने यांचा विचार करून त्या माणसाने (तसेच त्या समाजाने) केलेली निवड हे त्या वेळीही खरे होते. आर्थिक निवड करताना सर्व काळातल्या माणसाने प्रथम मूलभूत गरजांचा विचार केला आहे; नंतर सुखसोयींचा विचार केला आहे व अखेरीस कमरणूक साधनांचा विचार केला आहे.

माणसाच्या या आर्थिक निवड पद्धतीशी संबंधित तीन प्रकारच्या राज्यव्यवस्था १८ व्या शतकातल्या औद्योगिक क्रांतिनंतर अस्तित्वात आल्या. १) भांडवलशाही (कॅपिटॅलिझम), २) समाजवाद व साम्यवाद (सोशलिझम आणि कम्युनिझम), ३) उदारमतवादी लोकशाही (लिबरल डेमोक्रसी). यातल्या उदारमतवादी लोकशाही राज्यव्यवस्थेमध्ये (अमेरिका व इतर पश्चिम युरोपीय देशात ती आहे) व साम्यवादी राज्यव्यवस्थेमध्ये (रशिया व चीनमध्ये ती आहे) १९५० च्या दशकात शीतयुद्ध झाले. १९६० च्या दशकारंभी समझोता होऊन ते शीतयुद्ध संपले. १९८० च्या दशकाअखेर जागतिकीकरण, मुक्त बाजारव्यवस्था व उपभोक्तावाद जगभर उदयास आला व त्याचा सर्वत्र प्रसार झाला. आधुनिक अर्थशास्त्राचा या घटनांचा मागोवा घेत विकास झाला आहे.

या तीन अर्थव्यवस्थांपैकी एक अशा भांडवलशाहीचे वैशिष्ट्य असे की भांडवलाच्या निर्मितीवर तीमध्ये बंधन नसते; खाजगी क्षेत्राला पूर्ण स्वातंत्र्य व स्वायत्तता असते; वस्तूंची मागणी, त्यांचा पुरवठा या दोन गोष्टींवर आधारित असलेले वस्तुमूल्य बाजारातच ठरते. खाजगी क्षेत्रावर बंधने नसतात, स्वहित व स्पर्धा ह्या दोन त्या व्यवस्थेच्या प्रेरकशक्ती - ड्रायव्हिंग फोर्सेस - असतात. भांडवलशाही अर्थव्यवस्थेत व्यक्ती महत्त्वाची असते. मानवी समूह महत्त्वाचा नसतो असे अठराव्या शतकानंतरचे व्यक्तिवादाच्या प्रभावाखाली असलेले भांडवलशाही युगातले हे आधुनिक अर्थशास्त्र मानते.

याउलट, समाजवाद व साम्यवादामध्ये मानवी समूहाला अधिक महत्त्व असते; सरकारी क्षेत्र अधिक प्रभावी असते; सरकारकडून जनहित लक्षात घेऊन भांडवल, उत्पादन व उपभोग आणि बाजारव्यवस्थेवर नियंत्रण ठेवले जाते; अर्थव्यवस्थेच्या नियोजनाची निश्चित दिशा ठरवली जाते. वस्तूमूल्यही सरकारच ठरवते. ही दुस-या प्रकारची अर्थव्यवस्था आहे.

जगामध्ये अविकृत स्वरूपाची भांडवलशाही केव्हाच अस्तित्वात नव्हती. मिश्र अर्थव्यवस्था सर्वत्र दिसत होती हे लक्षात घेतले पाहिजे. भारतात अशीच मिश्र अर्थव्यवस्था होती व आहे. पण त्याचबरोबर हे पण लक्षात घेतले पाहिजे की भांडवलशाही अर्थव्यवस्था असलेल्या जवळजवळ सर्वच देशात लोकशाही राज्यव्यवस्था आहे व होती. त्या देशानीही लोककल्याण हा हेतू आपल्या समोर ठेवला होता. मताला महत्त्व असणा-या लोकशाही राजव्यवस्थेत जनकल्याण दुर्लक्षून








चालत नाही. लोककल्याण हा हेतू लोकशाही असलेल्या सर्वच देशांना समोर ठेवावा लागला होता. तेव्हा भांडवलशाही मुख्य अर्थव्यवस्था असलेल्या देशातही एक प्रकारची मिश्रअर्थव्यवस्था होतीच.

गेल्या दोन शतकातील अर्थव्यवस्थेची वाटचाल जनकल्याण समोर ठेऊनच झालेली आपल्याला दिसते.

आधुनिक अर्थशास्त्र १८ व्या शतकात उदयास आले असे मानले गेले तरी अर्थविचार मात्र माणसाच्या वसाहतकाळापासून म्हणजे फार पूर्वकाळापासून होता हे उघड आहे. कारण अर्थशास्त्राचे मूळ असलेले तत्त्व- माणसाच्या अमर्याद गरजा - इच्छा व त्याकरिता असलेली मर्यादित साधने ही स्थिती - माणसाला सतत सतावित आली आहे. अगदी माणसाच्या आरंभकाळापासून तो आजवर हीच स्थिती राहिली आहे. प्राचीन भारत, चीन, ग्रीस, रोम वगैरे प्राचीन संस्कृतीत हेच वास्तव होते. मध्ययुगात - म्हणजे इ. स. ५०० ते १५०० या काळात त्या काळाला साजेसा अर्थविचार होताच. विद्येच्या पुनरुज्जीवन काळात म्हणजे रेनेसांकाळात हळूहळू सर्वच शास्त्रांना व समाजशास्त्रांना वेगळे व नेटके असे रूप मिळाले. त्यांचा नीट अभ्यास सुरू झाला. अर्थशास्त्रालाही नेटकेपणा १८ व्या शतकात आला. एक महत्त्वाचा ज्ञानविषय म्हणून त्याला अभिजाततावादी कालखंडात महत्त्व मिळाले. १६ वे ते १८ वे शतक हा अर्थशास्त्राचा अभिजाततावाद पूर्व काळ मानला जातो. या काळात युरोप मधले धाडसी समुद्रप्रवासी नव्या जगाचा व त्याच्या समुद्रवाटेचा शोध घ्यायला व धर्मप्रसार, व्यापार, इतरांवर वर्चस्व गाजवणे अशा विविध प्रेरणा घेऊन प्रवास करायला लागले. त्यांच्या या कृतीला अर्थातच धार्मिक युद्धाची (क्रुसेडची) व आशियाकडे येण्याची खुष्कीची वाट बंद झाल्याची पार्श्वभूमीही होती.

या काळात वस्तूंच्या देवघेवीवर चालणारा जगातला व्यापार १७ व्या शतकापासून नाण्यांच्या मदतीने सर्वत्र चालू लागला. व्यापारव्यवस्थेचा (मर्कंटॅलिझमचा) उदय झाला. अगदी वेगळ्याच वाटेने जगातल्या अर्थव्यवस्था जाऊ लागल्या. १७६३ मध्ये विक्टर द रिकेटीने नव्या अर्थव्यवस्थेला मर्कंटॅलिझम हे नाव दिले. अॅडम स्मिथ या अभिजात अर्थशास्त्राचा जनक म्हणून प्रसिद्ध झालेल्या अर्थशास्त्रज्ञाने तो शब्द लोकप्रिय केला.

अॅडम स्मिथ (१७२३-१७९०) या आधुनिक अर्थशास्त्राचा जनक म्हणून मान्यता पावलेल्या अर्थशास्त्रज्ञाने अॅन इन्क्वायरी इन्टु द नेचर एँड कौझेस ऑफ द वेल्थ ऑफ नेशन्स या प्रसिद्ध पुस्तकात जमीन, श्रम व भांडवल हे उत्पादनाचे तीन प्रमुख घटक आहेत हे मांडले. नव्या अर्थव्यवस्थेत त्याने भांडवलाला महत्त्वाचे स्थान दिले हे लक्षात घेतले पाहिजे. माणूस प्रथम आपल्या मूलभूत गरजा भागवतो, नंतर महत्त्वाच्या सुविधांकडे लक्ष देतो व नंतर करमणूक साधनांवर तो खर्च करतो; जमेल तशी तो बचत करतो व भांडवल गुंतवणूकही तो करीत असतो; ही माणसाची आर्थिक कृती असते व त्यामागे त्याची स्वहिताची व फायद्याची प्रेरणा असते. हे मांडित असतानाच अॅडम स्मिथने मानवतावादी भूमिकाही घेतली होती. स्पर्धा, स्वार्थप्रेरणा, स्वप्रेम यांना मात्र त्याने नजरेआड केले नव्हते. नव्या अर्थशास्त्राचा तो पाया होता.

१८ व्या शतकांत तंत्रविद्या फार प्रगत नव्हती. तेव्हा अॅडम स्मिथने उत्पादनात महत्त्वाची भूमिका असलेल्या श्रमांना अतिरिक्त महत्त्व देणे स्वाभाविक होते. उत्पादनाचे इतर घटक - म्हणजे व्यापारपद्धती, स्पर्धा, विशिष्ट अर्थव्यवस्थेचा झालेला आर्थिक विकास, स्वनियंत्रण, श्रमविभागणी - हे पण उत्पादित वस्तूचे विनिमयमूल्य ठरवीत असतात हे स्मिथ जाणत होता. पण त्या काळात विनिमयमूल्य श्रमाधारित असते असे त्याने मार्क्सप्रमाणेच मानले आणि हे स्वाभाविक होते. कारण श्रम वस्तूमूल्य ठरवायला कारणीभूत असतात हे त्या वेळी सर्वत्र व सहज दिसणारे वास्तव होते.

अॅडम स्मिथ जे अर्थशास्त्र पुरस्कारित होता त्याला अभिजात अर्थशास्त्र किंवा क्लासिकल इकॉनॉमिक्स म्हणतात. आधुतिनक काळात १८ व्या शतकात नव्यानेच उदयास आलेल्या व्यक्तिवादाशी ते अर्थशास्त्र सुसंगत होते. मानवी समूहांचा विचार त्यात मध्यवर्ती स्थानी नव्हता. त्या अर्थशास्त्राचे मुख्य घटक तीन होते. - स्पर्धा, मागणी-पुरवठा संबंध व मुक्त बाजारव्यवस्था. मक्तेदारी - मोनोपली - त्या अर्थशास्त्राला मान्य नव्हती. उपभोक्त्याचे सार्वभौमत्त्व हे अभिजात अर्थशास्त्र

पुरस्कारित होते.

ॲडम स्मिथप्रमाणे जेरेमी बेंथॅम (१७४८-१८३२), डेविड रिकार्डो (१७७२-१८२३), जॉन स्टुअर्ट मिल (१८०६-१८७३), टोमस माल्थस (१७६६-१८३४) हे १८ व्या व १९ व्या शतकातले चार अर्थशास्त्रज्ञही अभिजात अर्थशास्त्र पुरस्कारणारे इतर महत्त्वाचे अर्थशास्त्रज्ञ होते.

यातला जेरेमी बेथॅम (१७४८-१८३२) हा अर्थशास्त्रज्ञ हे शास्त्र उपयुक्ततावादी - युटिलिटेरिअन - असते असे मानणारा अर्थशास्त्रज्ञ होता. तो मुक्तबाजारव्यवस्था व आरोग्यविमा पुरस्कर्ता म्हणूनही ओळखला जातो. भाषणस्वातंत्र्य पुरस्कर्ता, सार्वत्रिक मतदानाचा पुरस्कार करणारा, तुरुंग सुधारणा सुचविणारा व प्राणिमित्र म्हणूनही त्याची ओळख आहे. त्याचे ॲन इंट्रोडक्शन टु द प्रिन्सिपल्स ऑफ मोरल्स ॲंड लेजिस्लेशन हे पुस्तक जशी अभिजाततावादी अर्थशास्त्राची मांडणी करते, तसेच ते उपयुक्ततावादाचीही नीट मांडणी करते.

डेविड रिकार्डो (१७७२-१८२३) हा अर्थशास्त्रज्ञ आंतरराष्ट्रीय व्यापाराचा पुरस्कर्ता होता. त्याच्या ऑन द प्रिंसिपल्स ऑफ पोलिटिकल इकॉनॉमी (१८१७) या मुख्य पुस्तकात त्याने आंतरराष्ट्रीय व्यापाराचा पुरस्कार केला आहे.

जॉन स्टुअर्ट मिल (१८०६-१८७३) हा अर्थशास्त्राबरोबरच राजकीय सिद्धान्त मांडणारा व शिक्षणाचा पुरस्कार करणारा मोठा विचारवंत म्हणूनही ओळखला जातो. प्रिंसिपल्स ऑफ पॉलिटिकल इकॉनॉमी (१८४८) या ग्रंथात त्याने आर्थिक विकासाची कल्पना स्पष्ट केली आहे.

टोमस माल्थस (१७६६-१८३४) हा त्याच्या लोकसंख्यावाढीच्या सिद्धान्ताबद्दल प्रसिद्ध आहे. संख्याशास्त्राचा आधार घेऊन त्याने असे मांडले की, लोकसंख्यावाढीचा दर आर्थिकविकास दरापेक्षा जास्त असतो. म्हणजे लोकसंख्यावाढ = गरीबी हे समीकरण सत्य असते असे त्याने मांढले. घटत्या उपभोक्तता सिद्धान्ताबद्दलही - थिअरी ऑफ डिमिनिशिंग रिटर्न्स - माल्थस प्रसिद्ध आहे. वस्तूच्या वाढत्या उपभोगामुळे एका ठराविक सीमेपर्यंत उपभोक्त्याला सुख-समाधान मिळते; पण त्या बिंदूनंतर मात्र त्याचे सुख-समाधान कमी कमी होत जाते हा त्याचा घटत्या उपभोक्ततेचा सिद्धान्त अर्थशास्त्रात व सामाजिक जीवनात विचार करायला लावणारा सिद्धान्त ठरला.

ॲडम स्मिथ व हे चार अर्थशास्त्रज्ञ अभिजातवादी अर्थशास्त्राचे पायाभरणी करणारे अर्थशास्त्रज्ञ ठरले. आर्थिक विकास म्हणजे काय; तसेच बाजारव्यवस्था, मालमत्ता, विनिमयमूल्य, पैसा, उपभोक्त्याचे समाधान या मूलभूत गोष्टींविषयी सिद्धान्त मांडण्याचे महत्त्वाचे काम या ५ अर्थशास्त्रज्ञानी केले. त्यानंतरच अर्थशास्त्राला नवे वळण लागले; अधिक शास्त्रशुद्ध पायावर त्याची उभारणी झाली व अर्थशास्त्र विद्यापीठीय पातळीवर अभ्यासले जाऊ लागले, त्याचा विद्यापीठीय अभ्यासक्रमात प्रवेश झाला.

(२)

मार्क्सवादी अर्थशास्त्राचा आपण सविस्तर विचार करणार नसलो, तरी अर्थशास्त्राचा आढावा घेताना मार्क्सवादी विचार टाळणे शक्य नाही. १९ व्या शतकाच्या मध्यावर युरोपमधल्या औद्योगिक कामगारांची आर्थिक व सामाजिक स्थिती असमाधानाची होती. जास्त काम, शोषण, कारखान्यातील वाईट वातावरण या स्थितीत कामगार जगत होते. त्या स्थितीबाबत राजकीय व आर्थिक जागृती व परिस्थितीचे कठोर विश्लेषण आवश्यक होते. ते ऐतिहासिक काम जर्मन विचारवंत कार्ल मार्क्स (१८१८-१८८३) ने आपल्या कम्युनिस्ट मॅनिफेस्टो (१८४८), दास कॅपिटल (१८६७) व इतर ग्रंथातून व अनेक पॅम्प्लेट्समधून केले. राजकीय व आर्थिक क्रांतिशिवाय सद्यस्थिती बदलणार नाही याची त्याला खात्री होती. श्रमिकांच्या दारिद्र्यावर व श्रमिकांच्या शोषणावर श्रमिकांच्याच राज्याचा उपाय आहे अशी मांडणी करून त्याने क्रांती व शोषितांचे राज्य हा उपाय सुचवला व त्या श्रमिकांच्या राज्याचा त्याने आयुष्यभर पुरस्कार केला. भांडवलाची खाजगी मालकी त्याला अमान्य होती. सर्व उत्पादनसाधने व संपत्ती सरकारी, सार्वजनिक मालकीची असावी याचा त्याने पुरस्कार केला. भांडवलाची व्याख्या करताना श्रमाचे अतिरिक्त मूल्य म्हणजे मालकांनी ओरबाडून साठवलेले भांडवल असे मांडून त्याने नवेच

मार्क्सवादी अर्थशास्त्र तयार केले. त्याला या कामात दुसरा जर्मन चळवळ्या विचारवंत फ्रेडरिक एंगल्सची साथ मिळाली व हे क्रांतिकारी अर्थशास्त्र आणि मार्क्सवादी राजकीय भूमिका तयार झाली.

मार्क्सने ऐतिहासिक दृष्टीने आजवरच्या सर्व अर्थव्यवस्थांकडे पाहिले व त्यांचा नीट अभ्यास व विश्लेषण केले. माणसाचे आदिम काळातले जीवन, त्याचे संघटित स्वरूपातले टोळीजीवन, नंतरची राजेशाही, त्यानंतर आलेली सामंतशाही - जमीनदारी व मध्ययुगा-नंतरच्या युरोपातील भांडवलशाही या आजवरच्या मानवाच्या उत्क्रांतीच्या टप्प्यांकडे त्याने चिकित्सक दृष्टीने पाहिले. त्याच्या लक्षात आले की, उत्पादनाच्या प्रक्रियेत 'आहे रे' व 'नाही रे', म्हणजे 'हॅव्ज' आणि 'हॅव नॉट' असे दोन परस्पर विरोधी हितसंबंध असणारे वर्ग निर्माण होतात. मग 'आहे रे' हा वर्ग 'नाही रे' म्हणजे भांडवल नसणारा श्रमिकांचा वर्ग याचे शोषण करू लागतो; श्रम करून श्रमिक वस्तू उत्पादन करतात. पण ते उत्पादन करीत असलेल्या वस्तूंचे अतिरिक्त मूल्य 'आहे रे' हा वर्ग भांडवलाच्या बळावर आपल्या ताब्यात घेतो; श्रमिकांचे शोषण करण्यात येते. श्रमिकांना लुबाडून 'आहे रे' वर्गातले धनिक लोक नफा मिळवतात. समाजात प्रचारात असलेल्या वस्तूंची देवघेव पूर्वी त्या वेळच्या व्यापारपद्धतीत होतच असे व आजही पैशाच्या स्वरूपात व्यवहार होत असताना असेच शोषण घडत आहे असे तो म्हणतो. श्रमिकांचे श्रम याचे मूल्य म्हणजे उपयुक्ततामूल्य - यूज वॅल्यू - त्या श्रमिकाला सर्व जुन्या अर्थव्यवस्थात मिळाले नाही व आजही मिळत नाही. विनिमय मूल्य (एक्स्चेंज वॅल्यू) ह्या स्वरूपातच आज वस्तूचे मूल्य मोजले जाते. भांडवलदारांचा नफा म्हणजे उपयुक्तता मूल्य व विनिमय मूल्य यातला फरक उणे सर्व प्रकारचा उत्पादन खर्च असे मार्क्सचे गणित व समीकरण होते.

हे मार्क्सवादी अर्थशास्त्र व त्यानुसार चालणारी मार्क्सवादी राज्यव्यवस्था रशिया, चीन, उत्तर कोरिया, पूर्व युरोपीय देश व क्युबासारख्या देशात विसाव्या शतकात अनेक दशके चालली. लोकशाहीवादी अमेरिका विरोधी मार्क्सवादी राज्यव्यवस्था असलेले रशियासारखे देश यांच्यातले कोल्ड वॉर किंवा शीतयुद्ध १९५० च्या दशकात अस्तित्वात होते. ते १९६० च्या दशकारंभी संपले. मग १९६० च्या दशकापासून जगाची अर्थव्यवस्थाच बदलू लागली. जगातले अनेक देश तोवर पारतंत्र्यातून बाहेर पडून स्वतंत्र झाले होते. वसाहतवादी राज्यव्यवस्था संपली होती. अलिप्त देशांना व आशिया - आफ्रिकेतल्या देशांना जागतिक राजकारणात व अर्थकारणात महत्त्व मिळाले होते. तेल हे महत्त्वाचे अर्थसाधन बनले होते. तेल असणारे बरेच देश श्रीमंत बनले होते. तेल असेलेल्या देशांची ओपेक संघटनाही काम करू लागली होती. पण त्या अतिरिक्त तेल असलेल्या देशात लोकशाहीव्यवस्था मात्र स्थापन झाली नव्हती. अर्थकारणाला जागतिक स्तरावर प्राथम्य मिळाले होते. साम्यवाद हळू हळू जगावर कमी प्रभाव टाकू लागला होता. गोर्बाचेव या रशियन नेत्याच्या कारकीर्दीत पेरिस्त्रोइका - पुनर्रचना - व ग्लासनोस्ट - पारदर्शकता - ही धोरणे रशियात अधिकृत धोरणे आहेत असे ठरवण्यात आले. त्याच वेळी हे लक्षात घेतले पाहिजे की, साम्यवादी व लोकशाहीवादी देश हे आजवर चालत आलेले द्वंद्व यावेळी संपले होते. याचे कारण जगाची अर्थव्यवस्थाच आता बदलली होती. सर्व जग हीच बाजारपेठ झाली होती व या बाजारपेठेकरिता उत्पादन केले जात होते. भांडवलगुंतवणुकीला महत्त्व आले होते. उपयुक्ततामूल्य व विनिमयमूल्य या कल्पनांऐवजी आता अर्थकारणात जागतिकीकरणाचे व उपभोगाचे नवे युगच अवतरले होते. साम्यवादी चळवळीतला जोम नाहीसा होऊन जागतिकीकरणाला चालना मिळाली होती व साम्यवाद ही बलशाली अर्थविचार असणारी राजकीय विचारसरणी राहिली नव्हती.

जागतिकीकरण या अर्थविचाराला एक पार्श्वभूमीही होती. दुस-या महायुद्धातून बाहेर पडलेला युरोप व अमेरिका राष्ट्रउभारणीचे नवे सिद्धान्त शोधत होते. काही अर्थशास्त्रज्ञ नव्या संदर्भात आधीच विचार करू लागले होते. लोकशाहीतली भांडवलव्यवस्था विरुद्ध मार्क्सवादी राज्यव्यवस्था - अर्थव्यवस्था या द्वंद्वातून त्या अर्थशास्त्रज्ञांना बाहेर पडायचे होते.

यासंदर्भात कीन्स व शुम्पीटर या दुस-या महायुद्धा-आधीच्या अर्थशास्त्रज्ञांचा व १९५० च्या दशकातील गाल्ब्रेथ या अर्थशास्त्रज्ञाचा इथे थोडक्यात विचार करू.








जागतिक अर्थकारणाची पार्श्वभूमी असलेल्या कीन्स, गालब्रेथ व शुम्पीटर या अर्थशास्त्रज्ञांच्या विचारांचा केवळ आढावा घेऊन गेल्या दोन वर्षात अर्थविश्वात फार गाजलेल्या टोमस पिकेटी या अर्थशास्त्रज्ञाच्या *कॅपिटल इन द २१ फर्स्ट सेन्चुरी* या अर्थशास्त्रीय ग्रंथाचा काहीशा विस्ताराने इथे विचार करू.

देशाचा विकास होण्यासाठी सरकारने सक्रीय भूमिका बजावली पाहिजे या मताचा कीन्स हा अर्थशास्त्रज्ञ होता. कल्याणकारी राज्य या कल्पनेचा तो पुरस्कर्ता होता. त्याचा अमेरिकन व जागतिक राजकारणावर मोठा प्रभाव पडला. त्याचे सर्वात महत्त्वाचे पुस्तक द *जनरल थिअरी ऑफ एम्प्लॉयमेंट, इंटरेस्ट अँड मनी* (१९३६) हे जागतिक मंदीच्या पार्श्वभूमीवर प्रसिद्ध झाले. आर्थिक विकास अनेक प्रकारच्या आर्थिक कृतींवर अवलंबून असतो व सरकार आपल्या हस्तक्षेपाने आर्थिक घटकांवर प्रभाव टाकीत असते, असे त्याचे अनुभवावर आधारलेले मत होते. बाजारव्यवस्था, व्यय, रोजगार, पतपुरवठा, कर्ज, पैशाची बाजारातील उपलब्धता, भांडवल, योग्य आर्थिक वातावरण, उपभोगाचे वातावरण हे आर्थिक घटक ब-याच प्रमाणात सरकारी हस्तक्षेपावर अवलंबून असतात असे कीन्स मानत होता. मंदीच्या काळात सरकारने भांडवल गुंतवणूक मोठ्या प्रमाणात केली तर रोजगार वाढतील, अशी भूमिका त्याने घेतली. तत्कालीन अमेरिकन राष्ट्राध्यक्ष फ्रँकलीन रूझवेल्ट याला त्याने एक अनावृत्त पत्र न्यूयॉर्क टाईम्स मध्ये १९३३ मध्ये लिहिले. रूझवेल्टच्या न्यू डील या कार्यक्रमाला त्याने सैद्धान्तिक व नैतिक आधार दिला. संपत्तीचे योग्य वाटप, एका निश्चित दिशेने केलेली करआकारणी, बचत हे तीन घटक अर्थव्यवस्थेला बळकटी आणतात असे त्याचे मत होते. करआकारणी व त्रुटीचे अंदाजपत्रक या दोन गोष्टींमुळे मोठी रोजगार निर्मिती होऊन लोकातले संघर्ष टाळले जाऊ शकतात हे त्याचे दोन मुद्दे ही अर्थशास्त्राला त्याने दिलेली देणगी आहे असे मानण्यात येते.

इंटरनॅशनल मोनेटरी फंड व वर्ल्ड बँक या मोठ्या व जागतिक स्तरावर काम करणा-या संस्थांचा कीन्स सल्लागार होता; त्या संस्थांच्या योजना आखण्यात व दिशा निश्चितीत - पॉलिसी घडवण्यात - त्याचा महत्त्वाचा सहभाग होता.

जोसेफ शुंपीटर (१८८३-१९५०) हा महत्त्वाचा अर्थशास्त्रज्ञ विकसनशील राष्ट्रांच्या आर्थिक योजना ठरवण्यात महत्त्वाचा अर्थशास्त्रज्ञ ठरला आहे. आपले गांधीवादी अर्थशास्त्र शुंपीटरच्या स्मॉल इज ब्युटिफुल या तत्त्वाला जवळचे आहे. व्यापारातले तेजी-मंदीचे चक्र - बिझिनेस सायकल्स - व नवे शोध आणि त्यांचे विकासातील महत्त्व यावर त्याने विशेष काम केले, अभ्यास केला. त्या कामाबद्दल व अभ्यासाबद्दल तो प्रसिद्ध आहे. नवे नवे शोध औद्योगिकतेच्या ऊर्मीला चालना देतात असे त्याचे मत होते. व्यापाराचेही एक चक्र असते; व्यापार एकाच गतीने चालत नाही; कधी तेजी तर कधी मंदी असते व हे सगळे आधी समजते, प्रेडिक्ट करता येते (अभ्यासाने आधी सांगता येते) असे शुंपीटरचे म्हणणे होते. नवे शोध लागत नाहीत अशा काळात कंपन्या बंद पडतात व नवे शोध लागतात, त्या काळात जुनी उत्पादनपद्धती बाद होऊन नवी उत्पादन पद्धती तयार होते. स्थिराबते व उद्योगक्षेत्रात तेजीचा काळ येतो, अशी निरीक्षणाधारित भूमिका त्याने घेतली.

लहान प्रमाणात उत्पादन करणारे उद्योग किती महत्त्वाचे आहेत - विशेषता विकसनशील देशात - हे त्याने अर्थशास्त्राचा आधार घेऊन मांडले. *कॅपिटॅलिझम, सोशलिझम ऍंड डेमोक्रसी* हे त्याचे १९४२ साली प्रसिद्ध झालेले पुस्तक गाजले. त्याने कॉर्पोरेटिझम उदयास येईल, भांडवलशाही संपेल अशी भविष्यवाणीही केली होती. स्वनियंत्रण, स्वव्यवस्थापन व सर्जनशीलता यांचा तो पुरस्कर्ता होता. व्यापारीवृत्ती व उद्यमशीलता ठेऊन एक प्रकारची सर्जनशीलता जोपासता येते असे त्याचे म्हणणे होते.

अगदी थोड्या काळाकरिता शुम्पीटर ऑस्ट्रिआचा अर्थमंत्रीही होता. मग तो अमेरिकेत गेला व १९३२ साली त्याची हार्वर्ड विद्यापीठात प्राध्यापक म्हणून नियुक्ती झाली.

जॉन केनेथ गाल्ब्रेथ (१९०८-२००६) या तिस-या प्रभावशाली अर्थशास्त्रज्ञाचा विचार आता करू. ह्या मूळच्या कॅनेडिअन असलेल्या अर्थशास्त्रज्ञाने द *ऍफ्लुअंट सोसायटी* हे गाजलेले पुस्तक १९५८ साली प्रसिद्ध केले व त्याने






नवश्रीमंत वर्गाचे व मोठ्या उद्योगांचे अंतरंग उघड केले. संपत्ती कमावलेला हा वर्ग प्रसार माध्यमांवरही ताबा मिळवतो; प्रसारमाध्यमांवर त्यांनी स्थापन केलेले उद्योग ताबा मिळवतात व त्या उद्योगांच्या हिताचेच निर्णय सरकार कसे घेईल हे पाहतात. या सगळ्यामुळे समाजात विषमता निर्माण होते असे, त्याचे निरीक्षण आहे. सार्वजनिक चर्चाच अशा काळात थांबतात किंवा अतिशय दर्जाहीन होतात असेही तो म्हणतो. यावर उपाय म्हणून तो असे सुचवतो की लष्करी उत्पादनांचे राष्ट्रीयीकरण करावे; आरोग्यसेवा, वेतन व वस्तूंच्या किंमती यावर सरकारने नियंत्रण ठेऊन ही विषमता निर्माण करणारी परिस्थिती काहीशी बदलता येईल व समाजातील विषमता काही प्रमाणात दूर होईल. सरकारला समाजातील विषमता कमी करण्यासाठी पावले उचलावी लागतील ही सूचना गालब्रेथने केली. मुक्त अर्थव्यवस्थेला वेसण कशी घालता येईल याचा विचार करणारा तो विचारवंत होता.

या तीन अर्थशास्त्रज्ञांच्या विचारांचा आढावा घेतल्यानंतर एका नव्या विचाराचा - त्या विचाराला अर्थशास्त्रीय बाजूही आहे - इथे अगदी थोडक्यात विचार करू. जागतिकीकरणाबरोबरच पर्यावरणीय अर्थविचार होऊ लागला. हळूहळू हा विचार पसरतच होता. अगदी यंत्रयुगाच्या सुरुवातीपासूनच काही विचारी लोक वेगळ्याच दिशेने, एक सम्यक दृष्टीने विचार करीत होतेच. निसर्गाने आपल्याला जे संचित दिले आहे त्याचा आपण म्हणजे समकालीन पिढीने योग्य प्रमाणात वापर करावा असा तो विचार होता. माणसाने निसर्गात किती ढवळाढवळ करावी याला मर्यादा असली पाहिजे असे, १८ व्या शतकापासून अनेक विचारवंतांना वाटत होते. स्वच्छंदतावाद ब-याच प्रमाणात याच विचारावर आधारलेला होता. हळूहळू हा दृष्टिकोण सर्वत्र पसरत गेला. २० व्या शेतकातला डी. एच. लॉरेन्स सारखा कादंबरीकार मांडित होता की, माणूस हे निसर्गाचे अपत्य असून त्याने निसर्गाचा सतत विचार केला पाहिजे; अन्यथा त्याला या पृथ्वीतलावर राहण्याचा अधिकार नाही असे सतत तो आपल्या कादंब-यांतून दाखवित होता व आपल्या वैचारिक गद्यातून मांडित होता.

दुस-या महायुद्धातल्या अणुस्फोटामुळे ही मानव - निसर्ग सहकार्याची जाणीव अधिक प्रखर झाली. माणसाच्या उपभोक्ता बनण्याच्या इच्छेला मर्यादांचे कुंपण पाहिजे व निसर्गात ढवळाढवळ करताना आपण करीत असलेल्या कृतीचा माणसाने नीट विचार केला पाहिजे ही ती जाणीव होती. यातून पर्यावरणीय अर्थशास्त्राचा जन्म झाला. निसर्गासह माणसाला जगायचे आहे व निसर्गाच्या सहकार्यानेच माणसाची प्रगती साधायची आहे. त्या चौकटीतच उत्पादन व उपभोग या अर्थाशी किंवा पैशाशी संबंधित असलेल्या मानवी कृतींचा विचार करणे आवश्यक आहे ही नवी जाणीव त्या विचारात आहे; पर्यावरणरक्षण, ध्वनिप्रदूषणाचा व हवाप्रदुषणाचा विचार हा विकासाशी जोडलेला मुद्दा आहे; निसर्गाशी माणसाने सहकार्य करण्याचा मुद्दा आहे हे त्यांचे म्हणणे आता सर्वत्र मान्य झाले आहे.

या नव्या जाणीवेला अनुसरून संयुक्त राष्ट्रसंघटनेनेही या प्रश्नात लक्ष घातले आहे. अर्थशास्त्रातही या नव्या दृष्टीने विचार सुरू झाला आहे. पर्यावरणीय अर्थशास्त्र हे नवेच अर्थशास्त्र निर्माण झाले आहे. पाणी, वीज, माती यासारख्या साधनांचे समान व न्याय्य वाटप व्हावे म्हणून प्रयत्न होत आहेत. निसर्गसाधनांचा हिशेब-ऑडिट- केला जात आहे.

१९७२ च्या मोरोक्को परिषदेनंतर या नव्या विचाराला आंतरराष्ट्रीय स्वरूप मिळून त्या विचाराला आंतरराष्ट्रीय व्यासपीठ मिळाले व चालना मिळाली. रिओ द जानिरो च्या १९९२ च्या परिषदेपासून त्याला वेगळे व परिणामकारक वळण मिळाले. रिओ अर्थ समिट मध्ये सहभागी झालेल्या राष्ट्रांनी एका करारावर सह्या केल्या व पर्यावरणरक्षण एक आंतरराष्ट्रीय विषय बनला. त्यानंतरही अनेक परिषदा झाल्या. पण जपानमधील क्योटो परिषद व अलीकडची पॅरिस परिषद महत्त्वाच्या परिषदा ठरल्या. क्योटो करार - प्रोटोकॉल - अनेक राष्ट्रांनी मान्य केला. डिसेंबर २०१५ मध्ये पॅरिस परिषदेच्या मसुद्यावर अमेरिकन राष्ट्राध्यक्ष बराक ओबामा यांनी सही केली. नव्या जाणीवेनुसार प्रदुषण कमी करून पर्यावरण रक्षणाचा विचार केला जाईल व जागतिक तापमानवाढीचा विचार केला जाईल असे या मसुद्यात म्हटले आहे. समृद्ध पण सर्वाधिक प्रदूषण करणा-या

अनुक्रमणिका

अमेरिका या देशाने तो करार व विचार मान्य केला आहे. (आता निवडून आलेले राष्ट्राध्यक्ष डोनल्ड ट्रंप मात्र तो करार मानायला तयार नाहीत.)

पर्यावरण रक्षणविचार चालूच राहणार आहे व पर्यावरणीय अर्थशास्त्र यापुढे प्रभावी ठरणार आहे हे स्पष्टच आहे. हा विचार शास्त्रीय स्वरूपाचा असल्याने तो पुढे जाणारा विचार आहे. त्याचा सतत विकास होणार आहे. त्या–विचारातील मुद्दे अनेक व्यक्तींना व देशांना मान्य होणे, त्या मुद्द्यांवर सर्वसम्मती होणे आता कठीण नाही.

(३)

लेखाच्या या तिस-या भागात गेल्या दोन वर्षांत आर्थिक पटलावर महत्त्वाचे ठरलेले पुस्तक व त्याचा लेखक फ्रेंच अर्थशास्त्रज्ञ थॉमस पिकेटी यांचा विचार करू. १९८० च्या दशकानंतर सर्व जगात मुक्त बाजारव्यवस्था व जागतिकीकरण, उपभोक्तावाद किंवा चंगळवाद यांचे वारे वाहू लागले होते. तंत्रविद्या व माहिती तंत्रज्ञानातली डोळे दिपवणारी प्रगती, कंप्युटर क्षेत्र आणि आंतरजालक्षेत्र - इंटरनेट - यातले नवे नवे टप्पे यामुळे सारे सामाजिक वातावरणच बदलले होते. सेवा क्षेत्रातले बदल व त्या क्षेत्राची प्रगती आणि त्याची आधी न दिसलेली क्षमता यामुळे सर्वच गोंधळून गेले होते. औद्योगिक क्रांतीनंतर उत्पादन क्षेत्राचे प्राथम्य मान्य करण्यात आले होते. वर्गसंघर्षाचा सिद्धान्त त्यावरच आधारलेला होता. पण उत्पादन क्षेत्राला या १९८० च्या दशकानंतरच्या काळात दुय्यमपणा आला, प्राथम्य संपले. हे अनपेक्षित होते व सर्वांनाच ते धक्का देणारे ठरले.

या बदललेल्या वास्तवाच्या पार्श्वभूमीवर थॉमस पिकेटीचे *कॅपिटल इन द ट्वेंटी फर्स्ट सेंच्युरी* हे पुस्तक प्रथम २०१३ साली फ्रेंच भाषेत प्रकाशित झाले व मग २०१४ साली ते इंग्लिश मध्ये अनुवादित होऊन प्रकाशित झाले. या इंग्लिश अनुवादाने इतिहास घडवला. हे ७०० पेक्षा जास्त पानांचे अवघड अशा अर्थशास्त्र या विषयावरचे पुस्तक अनेक महिने बेस्ट-सेलर यादीत राहिले. त्याच्या लक्षावधी प्रती संपल्या. ते अगदी योग्य वेळी बाजारात आलेले पुस्तक होते. अनेकांनी राईट बुक ॲट द राईट टाईम असे त्याचे वर्णन केले आहे.

मुक्त बाजारव्यवस्थेच्या वातावरणात, उपभोगवादी वृत्ती जोपासली गेलेल्या काळात सर्वसामान्यांना सुख मिळाले-मिळत आहे असे वाटत होते. पण सभोवतालची विषमता पाहिल्यानंतर ब-याच जणांना विषण्णताही वाटत होती, आनंद मिळत नव्हता, माणसाचे श्रेयस काय हा प्रश्न त्यांच्या मनात उठत होता, पण त्याची योग्य व शास्त्रीय अभिव्यक्ती मात्र होत नव्हती. अशा वेळेला हे पुस्तक बाजारात आले. त्या पुस्तकात पिकेटीने आर्थिक विषमतेचा अभ्यास आधुनिक साधने वापरून सिद्ध केला. लोकांच्या मनात जे अव्यक्त होते ते शास्त्रीय साधने वापरून व्यक्त केले. आर्थिक विषमतेचा अभ्यास करणारे हे पुस्तक न्याय, समता, संपत्तीचे न्याय्य वाटप हे प्रश्न हाताळत होते. मार्क्सवादी अर्थशास्त्राला व मार्क्सवादी संकल्पनांना ते जवळ जाणारे होते. अर्थशास्त्रातल्या संकल्पना व संख्याशास्त्राचा उपयोग करून गेल्या २ शतकातल्या सांख्यिक माहितीचा - डेटाचा - वापर करून पिकेटीने पुस्तकाचा शास्त्रीय पाया भक्कम रितीने रचला होता.

समाजाच्या आर्थिक विकासदरापेक्षा जास्त वेगाने भांडवल वाढत असते कारण भांडवलावर मिळणारा नफा - रिटर्न्स - उत्पादनाच्या इतर घटकांपेक्षा जास्त महत्त्वाचा ठरत असतो असे पिकेटीचे म्हणणे आहे. समाजातली आर्थिक विषमता स्पष्ट करण्याचे काम पिकेटीने सर्व अभ्यास साधने वापरून केले होते. त्या अभ्यासात कसर ठेवली नव्हती. भांडवलशाहीमुळे लोकशाही मूल्येच धोक्यात येतात हे त्याने सप्रमाण पुस्तकात दाखवले व नव्या समाजासमोर एक आरसाच ठेवला आहे.

आपल्या पुस्तकात पिकेटीने संपत्तीचे न्याय्य वाटप हा विषय हाताळला आहे. कोठलीही सैद्धान्तिक भूमिका न घेता त्याने संख्याशास्त्राला मान्य असणारी पद्धती - विश्वसनीय माहिती गोळा करणे - वापरली आहे. औद्योगिक क्रांतीनंतरच्या २ शतकातली माहिती - डेटा - त्याने गोळा केली व अभ्यासली. सायमन कूझनेट या प्रतिष्ठित अशा समकालीन अर्थशास्त्रज्ञाचे त्याच्या मताशी न जुळणारे मतही (संपत्तीची जशी वाढ होईल तशी आर्थिक विषमता व असमानता दूर होईल हे कूझनेटचे पिकेटीच्या मताला

विरोधी असणारे मत आहे) त्याने विचारात घेतले आहे.

मग त्याने आर्थिक विषमता म्हणजे त्याच्या दृष्टीने काय हे स्पष्ट केले आहे. पिकेटीने r >g अशी चिन्हाच्या स्वरूपात आपल्या मुद्द्याची मांडणी केली आहे. या चिन्हातले r म्हणजे भांडवलावर मिळणारे सर्व प्रकारचे उत्पन्न - यात डिव्हिडंड, व्याज, भाडे इतर सर्व प्रकारचे उत्पन्न येते आणि g म्हणजे अर्थव्यवस्थेचा विकासदर. आपल्या अभ्यासावर आधारलेले पिकेटीचे पक्के मत आहे की भांडवलावरचे एकूण उत्पन्न नेहमीच आर्थिक विकासदरापेक्षा जास्त असते व या वाढीव वा अतिरिक्त उत्पन्नामुळेच भांडवल संचय होत असतो. आनुवंशिकतेने मग ते उत्पन्न पुढल्या पिढ्यांकडे दिले जाते.

समाजात निर्माण होणा-या विषमतेचा दुसराही आविष्कार असतो. वेतनाच्या वाढीच्या दरापेक्षा भांडवलाच्या वाढीचा दर जास्त असतो हा तो दुसरा आविष्कार. वेतनामध्येही विषमता दिसत असते. श्रमिक व वरच्या पातळीवरचे व्यवस्थापक यांच्या वेतनात मोठा फरक असतो. राजकीय धोरणांमुळेच हे होते. राजकीय गोष्टींचा वेतन ठरवण्याच्या या व्यवस्थेत मोठा हात असतो असे पिकेटी म्हणतो.

भांडवलाची वाढ कशा प्रकारे होते व ती कशी होते; भांडवल व मिळकत - इन्कम - यांचे प्रमाण काय असते; वेगवेगळ्या प्रकारची उत्पादन साधने व मिळकती कोणत्या असतात व त्या किती प्रमाणात असतात हे पिकेटीने नीट सांगितले आहे. विसाव्या शतकात १९१४ ते १९४५ या काळात भांडवल - मिळकत (इन्कम) हे प्रमाण २/३ ने कमी झाले - म्हणजे या काळात विषमता कमी होती व भांडवलाला अतिरिक्त महत्त्व नव्हते असे तो म्हणतो. तर १९४५ ते २०१२ या काळात भांडवल - मिळकत यांचे प्रमाण दुपटीने वाढले व परिणाम म्हणून आर्थिक विषमता या काळात वाढली आहे हे संख्याशास्त्रातील आकडेवारीचा - मिळालेल्या डेटाचा - उपयोग करून पिकेटीने सिद्धच केले आहे.

याचबरोबर त्याने हे दाखवले आहे की, गेल्या काही वर्षांत भांडवल या संकल्पनेत काही मोठे बदल झाले आहेत. देशी व परदेशी भांडवल असे भांडवलाचे दोन भाग करण्यात येतात. याशिवाय आणखी दुसरा घटक म्हणजे आता सरकारी कर्ज व सार्वजनिक कर्ज हे देखील अर्थव्यवस्थेत मोठी भूमिका बजावू लागले आहेत. (असे पूर्वी होत नव्हते.)

मार्क्सवादी विचारसरणी राजकीय व्यवस्थेत स्वीकारलेल्या चीन व रशिया यासारख्या देशात आता खाजगीकरणाला प्रोत्साहन मिळत आहे; सरकारीकरण व सार्वजनिकीकरण मागे पडत चालले आहे. १९७० नंतर हे सर्वच देशात घडत आहे. पिकेटी असे भविष्य वर्तवतो की विकसित देशातले भांडवल या २१ व्या शतकाअखेर ७ पटीने - म्हणजे ७०० टक्के वाढेल व या भांडवलावरचा नफाही वाढत राहील. एकूण राष्ट्रीय उत्पन्नात भांडवलाचे महत्त्व वाढेल असे त्याला वाटते. त्याच बरोबर नैपुण्याधारित, कौशल्याधारित श्रमांचे महत्त्वही वाढत राहणार आहे; शारीरिक श्रमांचे महत्त्व बरेच कमी होईल असेही तो म्हणतो. २१ व्या शतकात भांडवल व श्रम यामधली दरी किंवा गॅप वाढत राहणार आहे, असे पिकेटीचे निरीक्षणाधारीत व अभ्यासाधारित मत आहे. भांडवल संचयामुळे पिढीजात व आनुवंशिक संपत्ती वाढेल व आर्थिक विषमता वाढेल असेही त्याचे मत आहे.

आज ब-याच देशातले १० टक्के लोक आर्थिकदृष्ट्या वरच्या वर्गात; ४० टक्के लोक मध्यम वर्गात; तर ५० टक्के लोक आर्थिकदृष्ट्या खालच्या वर्गात मोडतात. (यात राष्ट्रा-राष्ट्रा प्रमाणे फरक आहेच; पण ही सर्वसामान्य स्थिती म्हणून मानता येईल.) आर्थिक विषमता दूर करणे हा आता जागतिक प्रश्न बनला असून तो संरचनात्मक - स्ट्रक्चरल - प्रश्न आहे असे पिकेटी आपल्या पुस्तकात दाखवतो. शिक्षणव्यवस्था, तंत्रविद्येतली प्रगती, व्यवस्थापन यांच्याशीही निगडित असा आर्थिक विषमतेचा हा प्रश्न आहे. शिक्षणात व उच्च शिक्षणात, सांस्कृतिक व वैद्यकीय क्षेत्रात मोठी भांडवल गुंतवणूक करून व किमान वेतन ठरवून काही प्रमाणात हा प्रश्न हाताळता येईल असे पिकेटीचे मत आहे. फ्रान्समध्ये १९५३ मध्ये किमान वेतन ठरवण्यात आले आहे, अमेरिकेत १९३३ साली किमान वेतन ठरले; त्यात नंतर ब-याच सुधारणा केल्या गेल्या. अलीकडच्या ओबामा राजवटीने किमान वेतनाची पुनर्रचना अलीकडेच केली.








आर्थिक विषमतेचा हा ऐरणीवरचा प्रश्न विकसित राष्ट्रांना समजला असून तो प्रश्न आपल्यापरीने हाताळायचा ती राष्ट्रे प्रयत्न करीत आहेत. भारतासारखे विकसनशील देशही असा प्रयत्न करीत आहेत.

भांडवलावरचा नफा आर्थिक विकास दरापेक्षा जास्त असतो (r>g) ही पिकेटीची मांडणी वैश्विक समीकरणाच्या रूपात समोर येते व आजवरचा माणसाचा इतिहास पाहिला तर ती सत्य ठरली आहे. विषमता वाढीचे हे पिकेटीचे विश्लेषण खरे ठरले आहे. सरकारने व केंद्रिय बँकेने परिणामकारक हस्तक्षेप केल्याने २००८ ची आर्थिक मंदी मोठी जागतिक हानी करू शकली नाही. पिकेटीने हे उदाहरणांसहित दाखवले आहे. पेन्शन अकाऊंट, सामाजिक सुरक्षेचे वेगवेगळे उपाय सर्वसामान्य लोकांना विषमतेची कमी झळ पोचवण्यात यशस्वी ठरले आहेत हे तो दाखवून देतो. समाज सन्मुख व्यवस्थांना हो प्रश्न समजला आहे, जाणवला आहे हे पिकेटी म्हणतो. क्रमाने वाढत जाणारा कर (प्रोग्रेसिव टॅक्सेशन), मालमत्तेवरचा कर (इस्टेट टॅक्स) व पिकेटीने सुचलेला नफ्यावरचा २ टक्के जागतिक स्वरूपाचा कर या तीन उपायांनी आर्थिक विषमता हा प्रश्न हाताळता येईल असे अर्थतज्ज्ञ पिकेटीचे ठाम मत झाले आहे.

कुशल तंत्रज्ञ परदेशी स्थलांतर करून व्यक्तिगत पातळीवर आर्थिक विषमतेचा प्रश्न सोडवीत आहेत. पण जहाल राष्ट्रवाद व संकुचित अस्मिता यांचा प्रतिकार करण्यासाठी अनेक स्तरातून विषमता दूर होणे आवश्यक आहे व हे या तीन उपायांनी होऊ शकेल असा आशावाद पिकेटी व्यक्त करतो. केंद्रीय बँक (भारतातल्या रिझर्व बँकेसारखी) काही प्रमाणातच आर्थिक विषमतेवर नियंत्रण ठेऊ शकते असे पिकेटी नजरेस आणून देतो. आज केलेला जागतिक पर्यावरणाचा विचार; तसेच आजचा माणूस पुढे येणा-या पिढ्यांना कोणते व किती प्रमाणात नैसर्गिक स्रोत वारसा म्हणून देणार आहे हा विचार फार महत्त्वाचा आहे असे त्याला वाटते. शिक्षणात अधिकाधिक व मोठी गुंतवणूक करणे, नव्या प्रकारच्या मालमत्तांचा विकास करणे आणि भांडवलावर नियंत्रण ठेवणे हे तीन उपाय आजच्या स्थितीत योग्य आहेत असे पिकेटीला वाटते. बाजारव्यवस्था, मतपेटी, लोकसहभाग व सुशासन यामध्ये समतोल निर्माण करून नवे पायंडे पाडणे आज आवश्यक आहे हे त्याचे मत आहे. आज उपलब्ध होणा-या नव्या माहितीचा व नव्या माहिती मिळवण्याच्या साधनांचा नीट उपयोग जनकल्याणासाठी करणे आवश्यक आहे; माहिती हे साधन असून साध्य नाही हे तो आवर्जून नजरेस आणतो.

मागल्या दोन शतकातली माहिती - डेटा - त्याने प्रयत्नपूर्वक अभ्यासली. त्या माहितीच्या अभ्यासातून पिकेटीच्या लक्षात आले की, आज जी आर्थिक विषमता दिसत आहे त्याचे मूळ या दोन शतकातल्या भांडवल गुंतवणुकीवरचा अतिरिक्त नफा हे आहे. तो नफा, ती अतिरिक्त संपत्ती आनुवंशिकरित्या हस्तांतरित झाली, साठवली गेली व वापरली गेली. त्यामुळे पारंपरिक उद्योजक हा भाडेकरू - रेंटिअर - बनला हे पिकेटीचे विश्लेषण विचार करायला लावणारे आहे.

शिक्षणातली, ज्ञानातली, पर्यावरणाला कमीतकमी हानी पोचवणा-या तंत्रज्ञानातली आज केलेली गुंतवणूक तात्कालिक फायदा देणारी नसेल, पण दूरदृष्टीने विचार केल्यावर ती गुंतवणूक फार फायदेशीर ठरते हे कोणाच्याही लक्षात येईल असे पिकेटीला वाटते. आंतरराष्ट्रीय सहकार्यामुळेही विषमता दूर व्हायला मदत होते हे त्याचे मत अनेकांनी केलेले स्थलांतर, युरोपिअन महासंघासारख्या अस्तित्वात आलेल्या घटना यामुळे आज प्रत्यक्षात आले आहे व या घटनांचे पिकेटी स्वागतच करतो, सामाजिक व आधुनिक दृष्टी ठेवली तर जगातले देश पेशासंबंधी योग्य निर्णय घेऊ शकतील, आर्थिक धोरणे योग्य रीतीने ठरवून पावले टाकणे आज सर्वच देशांच्या दृष्टीने आवश्यक झाले आहे. कोणती शासनपद्धती असावी, कोणते उद्योग खाजगी क्षेत्रात असावेत व कोणते उद्योग सरकारी क्षेत्रात असावेत हे आज नीट विचार करूनच ठरवणे योग्य होईल व शासनाने कृतिशील राहून अर्थव्यवस्थेवर जनहितासाठी नियंत्रण ठेवलेच पाहिजे असे पिकेटी ठामपणे आपल्या पुस्तकात मांडतो.

अर्थशास्त्र हे काही रसायन शास्त्र, फिजिक्स वगैरेसारखे भौतिक विज्ञान नाही; ते समाजशास्त्र आहे; एक मानवी विज्ञान आहे. अर्थशास्त्राला नैतिक, मूल्यात्मक, आदर्शवादी बाजू आहे. सामान्य नागरीक व

बुद्धिवंत भाष्यकार या दोघांनीही त्यावर सार्वजनिक चर्चा करणे आवश्यक असते. राजकीय धोरण लक्षात घेऊन आर्थिक धोरण आखले जाते. सामान्य लोक व विशेषज्ञ असा भेद या चर्चांबाबत व वेगवेगळ्या दृष्टिकोणांबाबत करणे योग्य नाही. कारण लोकशाहीत सर्वच नागरीक हे भागिदार - स्टेक होल्डर्स - असतात. सार्वजनिक जमा, खर्च, पैसाविषयक धोरण, करप्रणाली यावर सर्वांनीच चर्चा करणे आवश्यक आहे असे पिकेटी आग्रहाने मांडतो.

संख्याशास्त्रीय माहितीचा - डेटाचा - व गणिताचा वापर पिकेटीने आपल्या पुस्तकात केला असला, तरी इतिहासाचे ज्ञान व प्रत्यक्ष अनुभव यांना तो अधिक महत्त्व देतो. एखादा विशिष्ट निर्णय अपेक्षित दिशेनेच जाईल व आपले उद्दिष्ट गाठण्यात यशस्वी होईल असे ठामपणे सांगता येणार नाही; अर्थशास्त्रात नियंत्रित प्रयोग करता येणे कठीण आहे कारण ते समाजविज्ञान व मानवी विज्ञान आहे हे पिकेटी नीट जाणतो व स्पष्टपणे पुस्तकात तसे मांडतो.

अर्थशास्त्राला व्यवहारी बाजू असलीच पाहिजे व त्याला इतर समाजशास्त्रांबरोबर वाटचाल करावी लागेल याची जाणीव पिकेटी व्यक्त करतो. अर्थशास्त्राला व्यवहारी, राजकीय व आर्थिक या तिनही बाजू आहेत. तरीही ते एक अमूर्त - ॲब्स्ट्रॅक्ट - शास्त्र आहे हे आपण लक्षात घेतले पाहिजे. त्यातील काही विधाने काहीशी सुलभ -सिम्प्लिस्टिक- असतील असेही पिकेटी जाणीवपूर्वक म्हणतो.

पिकेटीचे *कॅपिटल इन द २१ फर्स्ट सेन्च्युरी* हे पुस्तक मार्क्सनंतरचे महत्त्वाचे अर्थशास्त्रीय पुस्तक म्हणून गाजले आहे. एक मूलभूत स्वरूपाचा सिद्धान्त या पुस्तकाने मांडला; आर्थिक विषमतेचा अर्थशास्त्रीय अंगाने विचार त्याने केला; भांडवल व नफा यासंबंधी नीट विचार त्याने आपल्या पुस्तकात मांडला हे स्पष्टच दिसते या दृष्टीने पाहिले तर ते अगदी मूलभूत विचार करणारे पुस्तक म्हणून गौरवले जाणे स्वाभाविक आहे.

या पुस्तकावर अनेक चर्चा झाल्या; अनेक लेख लिहिले गेले; अनेक मते व्यक्त करण्यात आली. त्यांपैकी काही मतांचा विचार इथे करू.

बिल गेट्स या अफाट संपत्ती मिळवणा-या पण प्रखर सामाजिक जाणीव असणा-या समकालीन माहिती तंत्रज्ञान उद्योजकाने या पुस्तकाचे तोंड भरून कौतुक केले आहे. आर्थिक विषमता दूर करण्यात व समता प्रस्थापित करण्यात सरकारची भूमिका महत्त्वाची असते हे पिकेटीने अर्थशास्त्रीय साधने वापरून दाखवले हे त्याला महत्त्वाचे वाटते. एखादी अर्थव्यवस्था विकास पावणारी आहे व योग्य दिशेने जाणारी आहे हे म्हणताना त्या समाजातील आर्थिक विषमता लक्षात घेतली पाहिजे. आर्थिक विषमतेचा कोठल्याही प्रकारे उदो उदो करू नये हे बिल गेट्सचे म्हणणे जगातल्या अतिश्रीमंत माणसाचे म्हणणे आहे हे लक्षात ठेवले तर त्याचे महत्त्व कळते.

मध्यमवर्गाचा उदय झाला आहे या घटनेचे बिल गेट्स स्वागत करतो व आपले म्हणणे मांडतो की, जगात समता प्रस्थापित होण्याची मध्यमवर्गाचा उदय ही एक पायरी आहे. पिकेटीच्या पुस्तकातील भूमिकेवर त्याचे काही आक्षेपही आहेत. त्यातील ५ सूचनांचा व आक्षेपांचा इथे उल्लेख करू.

१) भांडवलाच्या प्रकारात फरक केला पाहिजे. सामाजिक उपयुक्तता निर्माण करणारे भांडवल इतर भांडवलापेक्षा वेगळ्या प्रकारचे असते असे बिल गेट्सचे म्हणणे आहे.

२) वस्तूंचा कसा उपभोग घेतला जातो हे महत्त्वाचे आहे. पिकेटीने उपभोगाचा विचार मांडला नाही.

३) भांडवलावर कर लावा असे पिकेटीचे म्हणणे आहे; त्या ऐवजी उपभोगावर - कंझंप्शनवर - कर लावावा असे बिल गेट्स म्हणतो.

४) शिक्षण व संशोधन यावर भर देणे आवश्यक आहे असे पिकेटीप्रमाणे बिल गेट्सही म्हणतो.

५) मानवकल्याणासाठी मदत करणे - फिलांथ्रोपी - ही आज महत्त्वाची गोष्ट आहे, असे बिल गेट्सचे मत आहे.

बिल गेट्सच्या मताचा विचार केल्यानंतर स्टीवन केल्टन या मिसुरी विद्यापीठात शिकवणा-या अर्थशास्त्र तज्ज्ञाच्या मताचा विचार करू. केल्टनचे असे मत आहे की, पिकेटीचे पुस्तक योग्यवेळी आलेले पुस्तक ठरले. पुस्तक गाजण्याचे तेही एक कारण आहे. अमेरिकेतल्या

ऑक्युपाय वॉल स्ट्रीट मुव्हमेंटने जे अनुकूल वातावरण निर्माण झाले होते त्यामुळे बौद्धिक चर्चेची योग्य पार्श्वभूमी तयार झाली होती. त्या पार्श्वभूमीवर समतेचा विचार मांडणारे, आर्थिक विषमतेचा अर्थशास्त्रीय दृष्टीने नीट विचार मांडणारे हे पुस्तक डावा समतेचा विचार, मार्क्सवादी विचार बरोबर आहे ही जनभावना व्यक्त करते. आपल्या जवळची वंशपरंपरेने आलेली संपत्ती व भांडवल हे पूर्वजांचे कर्तुत्त्व आहे अशी समज पिढीजात श्रीमंताना हे पुस्तक अर्थशास्त्रीय चष्म्यातून देते हे पुस्तकाचे मोठे यश आहे असे केल्टन म्हणतो.

पुस्तकाचा आणखी एक भाष्यकार टायलर कौहेन हा जॉर्ज मेसन विद्यापीठात अर्थतज्ज्ञ म्हणून शिकवतो. पुस्तकात दोन महत्त्वाचे उपाय पिकेटीने विषमते संदर्भात मांडले आहेत असे तो म्हणतो - १) शिक्षणव्यवस्था सुधारणे व २) कमी उत्पन्न असलेल्या लोकांना जास्त उत्पन्न असलेले बनवणे. हे केले तरच विषमता दूर होईल असे पिकेटीप्रमाणे त्याचेही मत आहे.

बर्क्ली विद्यापीठातला अर्थशास्त्राचा प्राध्यापक ब्रॅडफर्ड डे लॉगने पुस्तकाचे कौतुक केले आहे व असे म्हटले आहे की, पुस्तकात ऐतिहासिक भाग लक्षणीय आहे. पिकेटीने केवळ तांत्रिक, शास्त्रीय व अर्थशास्त्रीय भूमिका न घेता एक ऐतिहासिक व नैतिक भूमिका घेतली आहे हे विशेष आहे असे त्याला वाटते. आपल्या अभ्यासात पिकेटिने इतिहास व समकालीन वास्तवाचे संख्यात्मक मूल्यमापन करताना इतर सामाजिक विज्ञानांचा व सामाजिक दृष्टीचा वापर केला व समाजकल्याणाचा विचार मांडला हे ब्रॅडफर्डला फार महत्त्वाचे वाटते. भांडवल व श्रम परस्परपूरक राहून आर्थिक विकास यापुढे हे दोन घटक घडवतील असा विश्वास ब्रॅडफर्ड व्यक्त करतो.

क्रूगमन या समकालीन मोठ्या अर्थशास्त्रज्ञाने पिकेटीच्या या पुस्तकाला दशकातले सर्वात महत्त्वाचे पुस्तक असे म्हटले आहे. त्यातल्या मौल्यवान संख्याशास्त्रीय पुराव्याचे - डॉक्युमेंटेशनचे - त्याने कौतुक केले आहे. दोन शतकातील अर्थव्यवस्थेशी संबंधित माहिती गोळा करणे हे काम पिकेटीने फार काळजीपूर्वक केले आहे; ऐतिहासिक दृष्टीने केले आहे; आर्थिक विषमतेचा असा अभ्यास अभूतपूर्व आहे असे क्रूगमनने म्हटले आहे.

विल हटन या अर्थतज्ज्ञाने पिकेटीचा निष्कर्ष आर्थिक विषमतेमुळे भांडवलशाही अर्थव्यवस्थेचे भवितव्य धोक्यात आले आहे - अर्थशास्त्रीय दृष्टीने मांडला आहे याचे कौतुकच केले आहे.

असेही भाकित करण्यात आले आहे की गेल्या शतकात आपल्या न्याय या कल्पनेबद्दल प्रसिद्ध झालेल्या जॉन रोल्स या अमेरिकन विचारवंताची जागा आता डाव्या विचारसरणीचा पिकेटी हा समता - विषमतेबद्दलचा सिद्धान्त मांडणारा विचारवंत घेईल.

पिकेटीचे महत्त्व स्पष्ट करणारे लेख अनेकांनी लिहिले असले, तरी त्याच्या विरोधकांची संख्याही लक्षणीय आहे. विषमता दूर करण्यासाठी व समता प्रस्थापित करण्यासाठी सरकारी हस्तक्षेप आवश्यक आहे हे पिकेटीचे मत काही अर्थशास्त्रज्ञांना पटले नाही. तशा हस्तक्षेपामुळे लोकशाही स्वातंत्र्यावर गदा येईल; शासकीय दबाव वाढेल; सरकारकडून टॅक्स व इतर रूपाने होणारी 'कायदेशीर लूट' समर्थनीय ठरेल असे अखेरीस पिकेटी म्हणत आहे व हे ब-याच जणांना या पुस्तकात आढळले आहे. ब-याच अर्थशास्त्रज्ञांना पिकेटीचा हा २ टक्के कराचा उपाय आवडलेला नाही. (आर्थिक विषमतेचा व शोषणाचा मूलभूत विचार पिकेटीने केला आहे हे सत्य ते मान्य करतात, पण सरकारी हस्तक्षेपाची कल्पना त्यांना पसंत नाही)

आता पॅट्रिमोनिअल कॅपिटॅलिझम - दबावाचा उपयोग करणारी भांडवलशाही - जोमाने वाढत आहे व आर्थिक विषमता वाढत आहे असे पिकेटीने मांडले आहे. यावर उपाय म्हणून तो वाढत्या दराने कर आकारणी सुचवतो व २ टक्के दराने जागतिक स्वरूपाचा संपत्ती कर असा दुसरा उपायही यावर सुचवतो. हे दोन अगदी नवे व क्रांतिकारक उपाय त्याला सुचले आहेत. पिकेटीचे $r>g$ हे समीकरण भांडवलावरचा नफा आर्थिक विकासदरापेक्षा अधिक वेगाने कसा वाढतो हे स्पष्ट करते व तेही अर्थशास्त्रीय व संख्याशास्त्रीय भाषेत. हे क्रांतिकारक काम आहे.

ଔଔଔ

# शेती, शेतकरी आणि शासन

लेखांक १३

श्री. के. वनपाल

गेल्या काही वर्षांत महाराष्ट्रावर जी दोन-तीन नैसर्गिक व अनैसर्गिक संकटे आली. ती म्हणजे ६१ सालचा पानशेतचा पूर, ६७ सालचा कोयनेचा भुकंप आणि ७२ सालचा दुष्काळ. त्यानंतर किल्लारीचा भूकंप हीदेखील मोठी नैसर्गिक आपत्ती होती. सध्या आपण ७२ च्या दुष्काळाच्या अनुभवाविषयी लिहू.

६९–७०, ७०–७१ आणि ७१–७२ या तीनही वर्षांत 'वर्षा' नावाचा काही ऋतु असतो. याचा महाराष्ट्राला अनुभवच आला नाही. विदर्भ म्हणजे हमखास पावसाचा प्रदेश त्यामुळे त्या भागात छोटे पाझर तलाव, कोल्हापूर पद्धतीचे बंधारे किंवा लघुपाटबंधारे यांपैकी कशाचीच तरतूद केलेली नव्हती. खुशाल कापूस पिकवावा, तुरीची आणि सोयाबीनची राने पिकवावीत आणि सुखेनैव शेतीची कामे करून पैसा मिळवावा हा तिथला व्यवहार शिवाय मोठ्याल्या शिवारांचे मालक हे आपल्या शेतावर काम करणा-या मजुरांना आपल्या लेकरांसारखे सांभाळत. त्यांच्या संसारातल्या प्रत्येक अडचणींची दखल घेत. सगळ्या त-हेची मदत करीत. त्यामुळे 'मजुरी' हा शब्दच नसे. मालकाचे काम म्हणजे आपलेच हा तिथे शिरस्ता होता. मराठवाड्यातही थोड्या फार प्रमाणात हीच स्थिती होती.

पश्चिम महाराष्ट्राची परिस्थिती अगदी वेगळी. जमीन ब-यापैकी पिकाऊ; पण प्रत्येक शेतक-याकडची जमीन फारच कमी. कुठे एकर-२ एकर, दहा एकर जमीन म्हणजे डोक्यावरून पाणी. 'रेन शॅडो'चा पट्टा म्हणजे सोलापूर, सांगली आणि सातारा या जिल्ह्यांचा पूर्व भाग. खडकाळ जमीन आणि पाण्याची सतत चणचण! त्यात माण तालुका म्हणजे 'मॅकेनाज गोल्ड' या चित्रपटात दाखवलेल्या प्रमाणे ओसाड माळाचा प्रकार. जिच्यामुळे या तालुक्याला 'माण' हे नाव पडले ती माण नदी वर्षभर कोरडी ठणठणीत असते.

(१)

या माण देशातील दहिवडी गावाला मी ७१-७२ सालच्या दुष्काळात 'बी. डी. ओ' म्हणून काम करीत होतो. आमच्या तालुक्याचे प्रशासन म्हणजे मी, तहसिलदार कुलकर्णी, पी. एस. आय. पाटील आणि डेप्युटी इंजिनिअर पी. एन. कुलकर्णी जिल्हा पातळीवर जिल्हा परिषदेचे सी. ई. ओ. साठे साहेब आणि कलेक्टर अफजलपूरकर साहेब. तालुक्याच्या दुष्काळाच्या कामाची जबाबदारी होती. ती सिंचन विभागाचे वाघ साहेब यांच्यावर. तालुक्याच्या चहुबाजूंनी दुष्काळाच्या कामांची मागणी असायची. त्या त्या भागात कुठे पाझर तलाव, कुठे खडी सेंटर्स, कुठे सार्वजनिक विहिरी अशी निरनिराळ्या प्रकारची कामे सुरू करावी लागत. कलेक्टर अफजलपूरकर साहेब हे कन्वाळू अधिकारी होते. आमची धावपळ आणि कामांची सततची मागणी पाहून त्यांनी आम्हाला सांगून टाकले होते की, 'योग्य असेल तर कुठलेही काम तिथल्या तिथे एस्टिमेट करून सुरू करीत जा आणि माझं 'पोस्ट फॅक्टो सॅक्शन घेत चला.' पण कुणाला काम नाही अशी स्थिती येऊ देऊ नका.' त्यामुळे कामाला मंजुरी घेणे हा प्रकार नव्हता. कोणत्याही गावात कोणतेही काम सुरू करून जनतेला शांत ठेवता येत होते.

साठे साहेब अतिशय हळवे होते. किती, ते खालील हकीकतीवरून समजून येईल. एकदा ते एका पाझर तलावाचे चालू असलेले काम पाहण्यासाठी आले. आम्ही पाझर तलावाच्या जवळ गेलो तेव्हा जेवणाची सुट्टी झाली होती. एक म्हातारी स्त्री फडक्यातील शिदोरी उघडत होती. मी सहज म्हटलं, "आजी जेवायला येऊ का? काय आणलंय बांधून?"

"अरे ये रे बाळा. भाकरी न् खरडा आणलाय. पण आज भाजी पिठलं असं काहीच नाही. पण बसतोस का बाबा, माझ्यासंग जेवायला? दोघांना बी पुरंल इतकी



अनुक्रमणिका

भाकरी हाय फडक्यात."

मला गहिवरून आलं पण तितक्यात साठे साहेब जवळ येत होते. त्यांनी माझं बोलणं ऐकलं असावं.

"अहो वनपाल, कमाल करता! ती म्हातारी उदार आहे म्हणून तसं म्हणाली. एरवी एखाद्याला चहा पाजायचा म्हटलं तरी आपण काचकुच करतो. तुम्हाला खरं सांगू का, हा मजुराचा जथा पाहून आणि त्यांच्या चेह-यावरच्या दु:खाच्या आठ्या पाहून मला तर असं वाटतं की, या 'गॉर्ज' (जिथे पाझर तलावाचा मध्यभाग येतो ती जागा) मध्ये आपल्या जीप सकट या सगळ्यांनी आपल्याला गाडून टाकलं पाहिजे. त्यांची ती अंगावरची लक्तरं, दीनवाणे चेहरे आणि खपाटीला गेलेली पोटं पाहून भडभडून येतं आणि या अवस्थेत तुम्ही त्या म्हातारीकडे जेवण मागता?"

मला तर काय सुचेना इतक्या हळव्या मनाचा अधिकारी आपल्याला मिळालाय तेव्हा त्याच्या समाधानासाठी तरी आपण या दुष्काळाला धारिष्ट्यानं तोंड दिलं पाहिजे असं मला वाटून गेलं.

(२)

अशा दुष्काळाच्या वणव्याशी झुंज देत असताना एक गंभीर प्रकार उद्‌भवला. तहसिलदार कचेरीवर अचानक एके दिवशी जवळजवळ सात-आठशे शेतक-यांचा मोर्चा आला. तहसिलदार कुलकर्णी पूर्वी माझ्या बरोबर ॲडिशनल तहसिलदार म्हणून अक्कलकोटला माझ्याच कचेरीत होते. त्यांचा माझा स्नेह होता. मोर्चा पाहून ते थोडे गडबडले आणि त्यांनी मला फोन करून ताबडतोब तहसिल कचेरीत बोलावले. मी लगेच गाडी काढून कचेरीत गेलो आणि मोर्चाच्या गर्दीतून वाट काढत कचेरीत पोचलो.

बाहेर मोर्चाचे पुढारी शासनाची खरड काढत होते. ती ऐकत ऐकतच मी आत पोचलो. "या तहसिलदार कचेरीच्या दगडी भिंतीसारखीच यांची मन दगडाची आहेत. अनायासे समोर खडी सेंटरची खडी पडली आहे. एकेकाने उठून खडीचाच मारा करून या तहसिलदाराला धडा शिकवला पाहिजे. हा दगडी किल्ला तोडला पाहिजे .....वगैरे"

अचानक मोर्चा आल्याने जवळ पोलिसांची मदत नाही; पी. एस. आय. फिर्तीवर गेलेले; जमाव चिडलेला; त्यात ही शेतक-यांना भडकवणारी भाषण! मी जरा घाबरलोच होतो. तहसिलदारांना मात्र मी आल्याने थोडा धीर आला.

अशा प्रसंगी नेहमीचा प्रघात असा की, मोर्चाच्या चार-पाच पुढा-यांना चर्चेला बोलावून प्रसंग हाताळायचा. निरोप पाठवून तहसिलदारांनी हे सगळं केलं होतं. पण जमाव खवळला होता. त्याचा फायदा घेऊन पुढा-यांनी उलट निरोप पाठवला की, 'तहसिलदारांनी बाहेर येऊन जमावाला उत्तर द्यावं, काम काढण्याची आश्वासनं द्यावीत; नाहीतर येणा-या प्रसंगाला तोंड द्यावं.'

"वनपाल साहेब, कसं करावं? हाताशी पोलीस नाहीत, काही भलतं-सलतं झालं तर अब्रू जायची आणि एखाद्या इन्क्वॉयरीला तोंड द्यायचा प्रसंग यायचा. मला तर काही सुचत नाही. बरं, नियमाप्रमाणं मला कचेरी सोडून बाहेरही जाता येत नाही."

"मी बघतो काय करायचं ते." असं म्हणून मी उठलो आणि कचेरी समोरच्या जमावाला सामोरा गेलो. गल्ला थोडा कमी बहुतेक तहसिलदार कोण? आणि बी. डी. ओ. कोण? हे चटकन कुणाच्या लक्षात आलं नाही. तरी एकानं मी बी. डी. ओ. आहे हे मुख्य पुढा-याच्या ध्यानात आणून दिलं.

"हे बघा, बी. डी. ओ. साहेब आलेत. बरीच काम ते हाताळतात. ते काय म्हणतात ते ऐकूया. पण फालतु आश्वासनं दिली तर आपण आधी ठरवलेलीच ॲक्शन घेऊया; काय?" पुढारी म्हणाले.

"हो ऽऽ, तसंच करू" — जमाव

आता माझी परीक्षा होती.

"माझ्या शेतकरी आणि कामकरी बांधवांनो", अगदी शांत चेहरा ठेवून मी बोलायला सुरुवात केली.

"मला कल्पना आहे, तुम्हाला काय सांगायचंय त्याची. पण तुम्ही ते सांगण्यापूर्वी मला तुमच्याशी थोडं बोलू द्या. तुम्हाला कल्पना आहे का की, या जमावातील काही शेतकरी कामकरी मंडळी एका वेळचं जेवण जेवतात. ते सुद्धा कसं असतं ते मी चाखून पाह्यलंय. उंबराच्या झाडाला जी फळं येतात, ज्याला तुम्ही उंबराच्या दो-या म्हणता, ती फळं मडक्यात घालून, त्यात पाणी

ओतून, मिरची-मीठ घालून जे काही रसायन तयार होईल ते पितळीत घेऊन त्यावर भूक भागवतात."

हे बोलत असताना मला अचानक हुंदका आला आणि मी थोडावेळ गप्प झालो.

"मी ते मिश्रण एकदा चाखून पाह्यलंय. माणसाची सहनशीलता म्हणजे काय, वेळ मारून न्यायची म्हणजे काय, याचा मला त्यावेळी अनुभव आला. अशा या बांधवांना काम मिळालं तरंच त्यांची गुजराण होणार याची मला, तहसिलदारांना आणि आमच्या 'इंजिनिअरिंग' स्टाफला कल्पना आहे. आम्ही कुणी बेफिकीर संस्थानिक नव्हेत किंवा स्वातंत्र्यापूर्वीचे ब्रिटीश अधिकारी नव्हेत. तुमच्यातूनच शिकून आणि नशिबानं अधिकारी होऊन तुमची सेवा करण्यासाठी १८-१८ तास काम करीत आहोत. तुमचे हाल आम्हाला समजत का नाहीत?"

पुन्हा मी शांत झालो! जमाव स्तब्ध.

"कोणकोणत्या गावातले तुम्ही आहात त्याची मला कल्पना नाही. त्या त्या गावच्या पुढा-यांनी कोणती कामं हवी आहेत त्याची यादी करावी, मी ती लगेच मार्गी लावतो."

"मला वाटतं मी जे म्हणतोय त्याच्यावर तुमचा विश्वास असेल. तेव्हा हे आत्ताच करा, म्हणजे आम्हालाही तुम्हाला काम दिल्याचं समाधान लाभेल."

कोणाला तरी हे खूप भावलं असावं. 'बी. डी. ओ. साहेबांचा विजय असो', असं एक जण किंचाळला. वास्तविक यात कसला विजय? पण परिणाम जबरदस्त झाला. एकदम जमावाचा नूर बदलला. जमावाच्या दोन-चार पुढा-यांना कळून चुकलं की, काही ॲक्शन घेण्यापेक्षा आता संयमानं काम केलं पाहिजे. त्यातल्या एकानं उठून जमावाला सांगितलं,

"आता बी. डी. ओं. नी आपल्याला खूरखूर आश्वासन दिलंय. आपण आता याद्या तयार करून कामाची मागणी करूया. इथेच याद्या करून बी. डी. ओंकडे सुपूर्द करूया. बी. डी. ओंना जाऊ द्या कचेरीत तहसिलदारांकडे. आपला उद्देश सफल झालाय."

मी तहसिलदारांची भेट घेऊन जाऊ म्हणून कचेरीकडे निघालो, तो त्यांनीच मला गाठलं आणि कडकडून मिठी मारली. माझे आभार मानले त्यांच्या डोळ्यातले अश्रु मला अजुन आठवतात.

(३)

कर्णोपकर्णी ही मोर्चाची गोष्ट कलेक्टर अफजलपूरकरांच्या कानावर गेली असावी. खटाव आणि माण तालुक्यातल्या दुष्काळाची त्यांना काळजी असे. त्यांनी एके दिवशी आमच्या तालुक्याचा दौरा काढला. ऑफिसचे काम उरकून एका सायंकाळी ते गोंदवल्याच्या डाक बंगल्यात दाखल झाले. मी तहसिलदार कुलकर्णी, डेप्युटी इंजिनिअर पी. एन. कुलकर्णी असे तिघे दुष्काळाबाबतची सगळी माहिती घेऊन त्यांना भेटायला गेलो.

"दुष्काळाचा अगदी तीव्र तडाखा बसलेल्या भागात आपण जाऊ या. मला काय उणीवा आहेत ते प्रत्यक्ष जाणून घ्यायचंय. पाण्याची, विशेषतः पिण्याच्या पाण्याची टंचाई कुठे आहे तिथे आपण जाऊ या."

तहसिलदार आणि मी, आम्हाला हेच हवं होतं. आम्ही सुचवलं की, सकाळी पिंपरी, म्हसवड वगैरे भागात जाऊ आणि भोजनात्तर वारूगड या डोंगरावरच्या वस्तीची पाण्यासाठी चाललेली धडपड सरांच्या नजरेला आणू या.

दुस-या दिवशी सकाळी ७ वाजता आम्ही बंगल्यातून निघालो. वाटेत असलेल्या प्रत्येक गावात थोडे थांबून, कधी दुष्काळी कामावर थांबून, चौकशी करून दुपारी १-१।। च्या सुमारास बंगल्यावर परतलो. इथेच नाट्य सुरू झालं.

तालुक्याचे एक पुढारी एम. एल. सी. होते. बहुतेक यशवंतराव चव्हाणांच्या कृपेने त्यांना 'प्रतोद' हे पद दिलं गेलं होतं. दुस-या एक डॉक्टर महिला या एम. एल. ए. होत्या. आम्ही आल्याबरोबर पाहतो, तो एम. एल. सी बंगल्याच्या हॉलच्या दारात दोन्ही हात पसरून उभे होते. त्यांनी कलेक्टर साहेबांचा प्रवेशच अडवला. म्हणाले, "आम्ही दोघं जनतेचे प्रतिनिधी. आपण आम्हाला आपल्या दौ-याची कल्पना दिली नाही. आम्ही आपल्या दौ-यात सामील झालो असतो. आपलं ठीक आहे. पण पंचायत समितीच्या बी. डी. ओंनी, डे. इंजिनिअर कुलकर्ण्यांनी किंवा तहसिलदार कुलकर्ण्यांनी तरी आपल्या दौ-याची कल्पना आम्हाला द्यायला हवी होती. यावर काय म्हणाल

तुम्ही? ते सांगितल्याशिवाय आम्ही तुम्हाला आत जाऊ देणार नाही. चुकलं की नाही, तहसिलदार आणि बी. डी. ओंचं?"

कलेक्टर साहेबांना समजेना, ते असं काय बोलतायत. पण त्यांनी समयसुचकतेनं उत्तर दिलं, "अहो, हा माझा दौरा म्हणजे दुष्काळी भागाची रूटीन पाहणी होती. एकदम ठरलं म्हणून मी आलो. एखादं फंक्शन असतं तर ठीक; पण हे आमचे दौरे गडबडीचे आणि माहिती घेण्याचे असतात."

"ते तुमचं झालं हो! पण या तहसिलदार, बी. डी. ओ. इंजिनिअर यांना तर माहित होतं ना? ते तर गावात होते. त्यांनी नको का आम्हाला सांगायला?"

"असं म्हणता? बरं, बघतो काय प्रकार घडलाय ते आणि सांगतो तुम्हाला काय ते. करतो या प्रकाराची चौकशी."

जरा नाराजीनंच एम. एल. सींनी हात बाजूला केले. कलेक्टर आत गेले. आम्ही श्वास सोडला. ही काय नसती बिलामत? थोड्या वेळात दोघेही आमदार पांगले. आम्हाला कलेक्टर साहेबांनी बोलावून घेतलं आणि विचारलं, "काय बिघडलं त्या दोघांचं? असं हमरीतुमरीवर येण्याचं कारण काय?"

मी म्हणालो, "सर, ही मंडळी एका बाजूला आणि पंचायत समिती दुस-या बाजूला असा प्रकार आहे. या ग्रूपचा एकही सदस्य पंचायत समितीत नाही. या दुष्काळी कामाचं सगळं श्रेय पंचायत समितीला जाणार ही ह्या जोडगोळीची पोटदुखी आहे. आता याला आम्ही काय करणार?"

अहो वनपाल, तुमचं हे सगळं खरं असेल. पण, तुम्ही ऐकलं नसेल कदाचित, मला ते असं म्हणाले की, "हा मुद्दा मी ॲसेम्ब्लीत काढीन. म्हणजे काम राहिलं बाजूला आणि ॲसेम्ब्लीत प्रश्नाचं शुक्लकाष्ठ मागे लागणार ना? तुम्ही जरा व्यवहार सांभाळून घ्यायचं होतं त्यांना बरोबर. तुम्हाला ते शक्य होतं की नाही?" - सर.

"खरं सांगू का सर, त्या दोघांकडे त्यांचे कार्यकर्त्येही फिरकत नाहीत. आमच्या पंचायत समितीवर खार खाणं मात्र हे सोडत नाहीत. मदत तर नाहीच नाही. पंचायत समितीचा आणि यांचा असा छत्तीसचा आकडा आहे! आम्ही काय करायचं? रूटीन कामाच्या दौ-यात आपण मिरवायचं, हा ह्यांचा स्वार्थ. दुस-या बाजूने पंचायत समितीचे सगळेजण 'ह्यांना का बरोबर घेतलं' म्हणून ओरडणार. पंचायत समितीचे सभापती आणि जिल्हा परिषदेचे बांधकाम सभापती हे त्यांचे कट्टर शत्रू!" – मी.

ह्या सगळ्या वादावादीत संध्याकाळ झाली. दुपारचा दौरा रद्द झाला.

"बरं, ते जाऊ द्या. आता उद्या त्यांना माझ्या दौ-यात सामावून घेण्याची व्यवस्था करा, म्हणजे त्यांचा राग थोडा शांत होईल. उद्या तुम्ही म्हणता त्या वारूगडला जाऊ."

हे आमचे बोलणे संपते तोच बांधकाम समितीचे सभापती यशवंतबुवा माने तिथे अवतरले. बहुतेक हा प्रकार सभापतींनी त्यांच्या कानावर घातला असावा. कारण सभापती सकाळच्या दौ-यात आमच्याबरोबर होते आणि ते लगेच बांधकाम सभापतीकडे जातो असे आम्हाला सांगून निघून गेले होते.

"यशवंत बुवांनी कलेक्टर साहेबांना, कलेक्टर साहेब नमस्कार!" अशी हाक मारली कलेक्टर साहेब कपडे बदलून बाहेर आले. "नमस्कार नमस्कार!", असे कलेक्टर साहेब म्हणाले. "तुम्ही म्हणे बी. डी. ओ., तहसिलदार आणि डे. इंजिनिअरची चौकशी करणार असं आमदारांना सांगितलं? अशी चौकशी–बिवकशी अजिबात करायची नाही. ही आमदार माझ्यासमोर फ्रॉकात हिंडत होती तेव्हा पासून तिला पाहतोय. एम. एल. सी काय प्रतीचे आहेत. ते तुम्ही स्वतः चौकशी करून ठरवा. या तीनही अधिका-यांनी दुष्काळात जे काम केलंय आणि करतायत त्याला तोड नाही. त्यांची चौकशी केली तर त्यांना काय वाटेल. हवं तर माझं म्हणणं मी तुम्हाला लिहून देतो. ते तुम्ही ॲसेम्ब्लीत मांडा. पण यांची चौकशी झालेली आम्हाला चालणार नाही. आमदारांना काय होतंय भांडण काढायला? तुम्ही काय करणार ते आता मला सांगा. आमच्या मागे काय केलंत तर ते चालणार नाही हां!"

कलेक्टर साहेब आवाक झाले. सकाळी आमदार

असं म्हणाले की, ॲसेम्ब्लीत प्रश्न विचारु आणि आता ते पंचायत समितीचे अध्यक्ष दुस-या बाजूने धमकावू लागले. कलेक्टर साहेबांनी त्यांची समजूत घातली आणि त्यांना वाटेला लावलं.

नंतर सर मला म्हणाले, "अशा अवघड स्थितीत तुम्ही काय करता आहात; हे मोठे गंभीर प्रकरण आहे."

"जाऊ द्या, सर, काही होणार नाही. उद्या अगदीच हातघाईवर प्रकरण आलं तर तेव्हा बघू. सध्या तुम्ही म्हणाला त्या प्रमाणे त्या दोघा आमदारांना बरोबर घेऊ मग तर झालं?"

दुस-या दिवशी आम्ही आमदारांना बरोबर घेतलं आणि सगळे वारूगडाला गेलो.

वारूगडावर दोन-तीनशे लोकांची वस्ती होती. पण पिण्याचं पाणी आणण्यासाठी त्यांना फलटणकडल्या उतारावरून तिकडच्या शेतक-यांच्या विहिरीतून पाणी आणावे लागत होते. वस्तुस्थिती अशी होती की, दीड-दोन मैल खाली उतरणं आणि पाणी घेऊन चढणं या हेलपाट्यात एकाही पुरूषाच्या डोक्यावर केस म्हणून शिल्लक राहिलेला नव्हता. आम्हाला हे माहित होतं आणि तेच सरांना दाखवण्यासाठी आम्ही त्यांना घेऊन आलो होतो. कलेक्टर साहेब ती गोष्ट पाहून थक्क झाले. दुष्काळ म्हणजे काय याचं त्यांना प्रत्यक्ष दर्शन झालं होतं. गडावरही बोअर विहीरी घेऊन पिण्याच्या पाण्याचा प्रश्न सोडवण्याचा प्रयत्न आम्ही केला होता. हे त्यांना दिसलं.

"वनपाल, या गावाला कुठल्याही कलेक्टरनं भेट दिली नसेल. गावाच्या चावडीत असलेल्या शेरे बुकात माझीही भेट मी नोंदवून ठेवतो. अगदी योग्य ठिकाणी तुम्ही मला आणलंत मला खूप बरं वाटलं."

आम्हालाही समाधान झालं आम्ही गप्प होतो. दोघे आमदार हे सगळे पाहात होते. त्यांनीही कलेक्टर साहेबांचे आभार मानले आणि तिथेच मानापानाचा व श्रेय वादाचा मुद्दा संपला!

उंबराच्या दोड्या तिखड मिठाबरोबर खाऊन ही शेतकरी मंडळी दिवस कंठत आहेत. हे कळल्यावर तर कलेक्टर साहेबही गहिवरले.

त्या दुष्काळात शेतीचा उद्योग थांबलाच होता. शेतक-यांची अन्न पाण्याविना परवड झाली होती. आम्ही जे शासन राबवत होतो ते किती थिटं होतं याचा अनुभव या दुष्काळात येत होता आणि ह्रदय पिळवटून निघत होतं.

ळळळ

# ग्युंटेर्ट आणि वैदिक दैवतशास्त्र

गणेश उमाकांत थिटे

हरमान ग्युंटेर्ट (Hermann Guentert) ह्यांचा जन्म ५ नोव्हेंबर १८८६ मध्ये जर्मनीतील वर्म्स् येथे झाला. त्यांचा मृत्यु २३ एप्रिल १९४८ मध्ये हायडेल्बर्ग येथे झाला. भाषाशास्त्र आणि धर्मेतिहास ह्या विषयांचे ते अभ्यासक होते. त्यांचे प्राथमिक शिक्षण वर्म्स् येथे झाले. नंतर अभिजात वाग्विद्या (Philology), तौलनिक भाषाशास्त्र ह्यांसारख्या विषयांचे अध्ययन हायडेल्बर्ग् येथे झाले. त्यांचा पी. एचडी. चा प्रबंध ग्रीक भाषाशास्त्र ह्या विषयावर होता. १९०९ ते १९२१ ते लाइपझिग् येथे शालाशिक्षक होते. १९२८ मध्ये ते हायडेलबर्ग्मधील विद्यापीठात प्रपाठक होते. १९२१ मध्ये रोक्स्टोक् येथे ते प्राध्यापक झाले (तौलनिक भाषाशास्त्र ह्या विषयांत). १९४६ मध्ये हायडेलबर्ग् येथील विद्यापीठात प्रा. बारटोलोमी ह्यांच्या निवृत्तीनंतर त्यांच्याच जागी त्यांची नियुक्ती झाली. दुस-या महायुद्धानंतर प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे त्यांच्या कार्याला मर्यादा घालावी लागली.

ग्युंटेर्ट ह्यांचे मुख्य कार्य इंडो-इरानियन, ग्रीक् आणि जर्मनिक् भाषाशास्त्र ह्या क्षेत्रात आहे. मानफ्रेड् मायरहोफर ह्यांनी लिहिलेल्या Antiquitates Indogermanicae ह्या ग्रंथात (Innsbruck 1974) आपणांस ग्युंटेर्ट ह्यांच्या सर्व लेखनाची एक यादी पाहण्यास मिळते. ग्युंटेर्ट ह्यांच्या लेखनातील Der Arische Weltkoenig and Heiland, Halle, 1923 ह्या ग्रंथातील विचारांचा परिचय करून देणे प्रस्तुत लेखात अभिप्रेत आहे. हे पुस्तक वैदिक दैवतशास्त्र ह्या विषयावर आहे आणि ते जर्मन्भाषेत लिहिले गेलेले आहे. मुळच्या जर्मन् पण सध्या अमेरिकेतील कॅलिफोर्निया प्रांतात राहणा-या मोनिका मे ऊर्फ उषादेवी ह्यांनी माझे लक्ष ह्या पुस्तकाकडे वेधले; इतकेच नव्हे तर ह्या ग्रंथाच्या दोन झेरॉक्स प्रती करून त्या मला पाठवल्या, तसेच ह्या पुस्तकाचे इंग्रजीत भाषांतर करावे असे मला सुचवले. ही सर्व हकीकत सुमारे पाच वर्षांपूर्वीची आहे. मधल्या काळात हे भाषांतराचे काम मी पूर्ण केले आणि सध्या ते प्रकाशनाच्या अवस्थेत आहे. केवळ मराठी वाचणा-या अभ्यासकांसाठी हा प्रस्तुत लेख लिहिला असून त्यात ह्या पुस्तकातील मुख्य विचारांचाच उल्लेख केला आहे. मूळ पुस्तक सुमारे ४२५ पृष्ठांचे आहे.

पुस्तकांच्या शीर्षकावरून हे पुस्तक मुख्यतः वैदिक देवता वरुण ह्याविषयावर असावे असे वाटते. कारण त्या शीर्षकाचा अर्थ आर्यांची विश्वसम्राट् आणि उपकारक अशी देवता (वरुण) असा आहे. अर्थात तो विषय ह्या पुस्तकात आहेच; पण इतर इन्द्र, सवितृ, विष्णु, मित्र अश्विन्, रुद्र, यम ह्यांसारख्या देवतांवरही ह्या पुस्तकात बरेच मोठे विवेचन आहे. त्यामुळे एकूणच वैदिक दैवतशास्त्रात ह्या पुस्तकाने महत्त्वाची भर घातली आहे.

पुस्तकाची सुरुवात बोगझ्क्वाई ह्या उत्तरमध्य तुर्कस्थानातील एका लेखात उल्लेख झालेल्या शपथ-देवतांच्या संदर्भाने झाली आहे. मिटांन्नी आणि हिटाईट्स ह्यांच्यात इसवी सन पूर्व १४ व्या शतकात झालेल्या तहाचा हा लेख आहे आणि त्यात काही बॅबिलोनमधील देवतांचा साक्षीदार म्हणून उल्लेख आहे. त्या देवतांच्या नावांचे काही वैदिक देवतांच्या नावांशी साम्य आहे. उदाहरणार्थ मित्र, वरुण, नासत्य हे लेख काही टॅबलेट्स्च्या स्वरूपात उपलब्ध आहेत. त्यावरून ह्या भागातील वैदिक देवतांचे अस्तित्व सिद्ध होते. तसेच ह्या मुद्यावरून ऋग्वेद हा भारताबाहेरचा ग्रंथ नसून पूर्णपणे "भारतीय ग्रंथ" आहे हे पिशेल् आणि गेल्डनर् ह्यांचे मत चुकीचे असल्याचे सिद्ध होते, असे ग्युंटेर्ट म्हणतात. ग्युंटेर्टने असेही मत मांडले आहे की, इंद्र म्हणजे सूर्य किंवा वरुण म्हणजे चंद्र हे काही अभ्यासकांचे मतही योग्य नाही. ह्याही पुढे जाऊन मित्र आणि वरुण ह्यांतील साम्य ते दाखवून देतात आणि मित्र हे वरुणाचेच एक रूप आहे असे मत ते मांडतात. त्याचप्रमाणे इन्द्र आणि वरुण ह्यांचे अनुक्रमे सूर्य आणि चन्द्र ह्यांच्याशी समीकरण स्वीकारल्यास त्या



अनुक्रमणिका

दोघांमधील स्पर्धेचे आणि संघर्षाचे स्वरूप स्पष्ट करता येत नाही. ग्युंटेर्ट ह्यांच्या मते इन्द्र हा मुळात एक युद्धातील नेता आणि वीर होता आणि त्याचे पुढे दैवतीकरण झाले असावे. इन्द्राच्या शारीरिक वर्णनावरून वरील मतास पुष्टी मिळते. तसेच इन्द्राच्या नॉर्डिक जर्मेनिक थोर ह्या देवतेशी असलेले साम्यही वरील मताला दुजोरा देते. इन्द्र हा शब्द ग्युंटेर्ट ह्यांच्या मते इंडोयुरोपीय धातु "ओइद्"("फुगणे") ह्या पासून निर्माण झाला असावा. इन्दु, इन्द्रिय हे शब्दही ह्याच धातूपासून व्युत्पन्न होतात. इंद्राची मुख्य कृती म्हणजे वृत्राला मारणे. त्याला वृत्रघ्न असे म्हटले गेले आहे आणि अवेस्ता ग्रंथातील वेरेथ्रग्न ह्या शब्दाशी त्या शब्दाचे साम्य आहे. वरुणाप्रमाणेच इन्द्र हीही एक सर्वोपकारक देवता आहे. भक्तांना संकटातून सोडवणे हे त्याचे एक महत्त्वाचे कार्य आहे. विष्णु, त्रित आप्त्य ह्यासारख्या देवतांनीही वृत्रहत्येमध्ये इन्द्राला सहकार्य केले होते. पर्जन्यदेवता ही इन्द्रदेवतेचेच एक अन्यरूप आहे. पूषन् ही देवता पशुपालनांशी संबंधित देवता होती. पशूंसाठी मार्ग शोधणे, त्यांची काळजी घेणे हे तिचे मूळ उद्दिष्ट होते.

आर्यांच्या लोकधर्मामध्ये मित्र ह्या देवतेला स्थान होते. मात्र आर्यांच्या एकूण धार्मिक जीवनात तिचे स्थान दुय्यम दर्जाचेच होते. मित्र शब्दाची रचना वृत्र, योत्र, यंत्र ह्या शब्दांसारखीच आहे. ह्या देवतेचा संबंध न्याय, कायदा इत्यादी कल्पनांशी होता. तिचा "करार" ह्या कल्पनेशीही घनिष्ठ संबंध आहे. मित्र शब्द "मे" किंवा "मि" ह्या धातूपासून बनला असावा. हा धातु अभ्युपगमात्मक (काल्पनिक) असून त्याचा अर्थ "बांधणे" असा आहे. तो एक इंडो-युरोपीय धातु आहे. मेखला हा शब्दही त्या धातूशीच संबंधित आहे. मित्र हे सूर्याचेच एक रूप आहे. अवेस्तातील मिथ्रद्रुज् हा शब्द आणि वेदातील मित्रद्रुह् हा शब्द हे दोन्ही कराराचा भंग करणारा अशा अर्थी आहेत. जुन्या पर्शियन मिथ्र ह्या शब्दातूनच नव्या पर्शियन भाषेतील मिहिर हा शब्द झाला असावा. आर्य विचारसरणीनुसार हात धरणे ह्या कृतीचा करार करणे ह्या कृतीशी संबंध आहे. विवाह ह्या अर्थी येणा-या पाणिग्रहण ह्या शब्दातूनही करार करण्याची कृती सूचित होते. सैन्य किंवा सेना, सेतु, हे शब्द "सि" ह्या धातूपासून तयार झाले असून त्या शब्दांचा संबंधही बांधणे, करार करणे ह्या कल्पनांशी आहे. आर्य हा शब्दही अभ्युपगमात्मक अशा अरिओ ह्या शब्दातून निघाला असून त्याचा अर्थ कराराने बांधलेला असा आहे. तर इराण हा शब्दही आर्याणाम् ह्या शब्दाशी संबंधित आहे.

वरुण ह्या देवतेला "असुर" असे अधिविशेषण वापरले जाते. तो राजा किंवा सम्राट ह्या स्वरूपात वर्णिला जातो. असुर शब्द ज्याच्याजवळ असु म्हणजे सामर्थ्य आहे, असा ह्या अर्थी वापरला जातो. अवेस्ता ग्रंथातील अहुर शब्दाचाही तोच अर्थ आहे. वरुणाच्या सामर्थ्यालाच माया असा शब्दही वापरला जातो. वेदातील मघ हा शब्दही सामर्थ्य ह्याच अर्थाचा आहे. त्यामुळे वेदातील मघवत् हा शब्द सामर्थ्ययुक्त ह्या अर्थी वापरला जातो. वरुणाला यक्षिन् असेही म्हटले जाते. त्यातूनही त्याची अद्‌भुत शक्ती सूचित होते. वरुण हा ऋत ह्या कल्पनेशीही संबंधित असणारा देव आहे. ऋत ही एक वैश्विक व्यवस्था असून वरुण तिचे पालन घडवून आणतो. अवेस्ता ग्रंथातील "अरेत" तसेच "अश" ह्या कल्पना ऋतकल्पनेला जवळच्या आहेत. वरुणाला यातुमावत् असेही म्हटले गेले आहे. यातु हा शब्द यत् ह्या धातूपासून निर्माण झाला असून मित्राच्या बाबतीत तो जनान् यातयति म्हणजे लोकांना योग्य ठिकाणी ठेवतो असे वर्णन आले आहे.

अदिती ही देवता "बंधनविरहित" अशा अर्थाची आहे. अदितीचा मुलगा आदित्य बंधनापासून सोडवणारा आहे.

सवितृ हेही वरुणाचेच एक रूप आहे. त्याचे वर्णन स्वङ्गुरि ("चांगली बोटे असणारा") किंवा सुपाणि ("चांगला तळहात असणारा") असे केले जाते. कॉकेशस् पर्वताच्या भागात "चांगला हात" ह्या स्वरूपाची काही चित्रे आढळतात. त्यावरून सवितृ-देवतेचा प्रसार किती व्यापक स्वरूपात होता ते कळते.

ह्याच संदर्भात ग्युंटेर्टने अवेस्तात आढळणा-या अमेश स्पेन्त ह्या देवतांचा उल्लेख केला आहे. आदित्य तसेच अमेश स्पेन्त हे देव म्हणजे "ग्रह" ही कल्पना ग्युंटेर्टने त्याज्य मानली आहे. आर्यांमध्ये दैववादाला स्थान नव्हते. त्यामुळेच ग्रह आर्य विचारसरणीत बसत नाहीत.

अर्यमन् (अवेस्तामधील ऐर्यमान ही देवता) आदित्यांच्या समूहात समाविष्ट आहे. तसेच दक्ष, भग, अश, वहिस्त्र, अरमति ("औदार्य"), हौर्वतात् ("पूर्णता") अमरतात् ("अमृतत्त्व") ह्यांसारखे आदित्य किंवा अमेश स्पेन्त ह्या गटात समाविष्ट होणारे देव मुळात "अव्यक्त" कल्पना ह्या स्वरूपात असावेत आणि नंतर त्यांना मूर्त रूप प्राप्त झाले असावे. हे सर्व देव वरुणाच्या विविध सामर्थ्यांची प्रतीके आहेत.

मरुत् हे देवगण इंद्राचे सहकारी आहेत. मरुत् तसेच मरु ("वाळवंट") ह्या दोन्ही शब्दांचा मृ ("मरणे") ह्या धातूशी संबंध आहे. म्हणून मरुतांचे मूळ रूप "मृतांचे आत्मे" ह्या प्रकारचे असावे. मरुतांना "रुद्रिय" असेही म्हटले आहे. रुद्र हा शब्द रुद् ("रडणे" किंवा "गर्जना करणे") ह्या शब्दापासून बनला आहे. मरुत् हे देवही गर्जना करणारे तसेच रुद्र हा देवही गर्जना करणारा म्हणून ह्या दोन्हींचा घनिष्ठ संबन्ध आहे.

वरुणाच्या आधी ज्या देवाला महत्त्व होते तो द्यौस् पितर् ह्यालाही असुर म्हटले गेले आहे. पण वरुणामुळे द्यौस् पितर् मागे पडला, वरुणाला महत्त्व आले. पण ग्युंटेर्टच्या मते ब्रह्मन्, आत्मन् ह्या कल्पनांना भारतीय विचारसरणीत महत्त्व प्राप्त झाल्यावर वरुणाचे महत्त्व कमी झाले. इराणमध्ये सुफी विचारसरणी वाढली; तर भारतात निराशावाद, दुःखवाद पसरला. ब्रह्मन्, आत्मन् हे शब्दही "सामर्थ्य" वाचक शब्दातूनच विकसित झाले आहेत. असुर शब्दाचा अर्थ "राक्षस" असा बनला. वरुणाची "माया" ही शक्ती "एक दुष्ट शक्ती" "वंचना" ह्या स्वरूपात नंतर रूपांतरित झाली. वरुण हा फक्त पाण्याचा किंवा समुद्राचा देव राहिला. मूळच्या सम्राटाचे एका मांडलिकात रूपांतर झाले. पुराणकाळात वरुण हा एक गौण असा देव बनला. मोक्षं, मुक्ती ह्या कल्पनांचे महत्त्व वाढले. वैष्णव विचारसरणीत "उपकारक", "त्राता" असा विष्णु हा देव पाप्यांनाही उद्धरतो अशी विचारसरणी रूढ झाली (पहा भगवद्गीतेतील अपि चेत् सुदुराचारो भजते किंवा स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रा....ह्या ओळी. त्यामुळे अपराध्यांना शासन करणारा, पण भक्तांचा उद्धार करणारा वरुण मागे पडून विष्णु हा अधिक लोकप्रिय झाला.

अशाच प्रकारे भक्तांचे तारण आणि उद्धार करणारी दुसरी एक देवता म्हणजे अश्विन्. अनेक संकटात पडलेल्या भक्तांना अश्विनांनी संकटातून सोडवले; त्यांना मदत केली. अश्विनांचे एक प्रसिद्ध अधिविशेषण म्हणजे नासत्य. ग्युंटेर्टने ह्या शब्दाची व्युत्पत्ती आणि शब्दशः अर्थ देण्याचा प्रयत्न केला आहे. त्याच्या मते ज्याप्रमाणे अदिति शब्दापासून आदित्य शब्द झाला किंवा वसति शब्दापासून वासत्य त्याप्रमाणे नसति ह्या शब्दापासून नासत्य हा शब्द झाला असावा. नसति शब्द अभ्युपगमात्मक आहे. तो नस् ह्या धातूपासून झाला असावा. नस् धातूचा अर्थ "एकत्र येणे; परस्परांच्या करारात येणे." त्यामुळे नसति शब्दातून "एखाद्या भक्ताकडे धावून जाऊन त्याला मदत करणे" असा अर्थ सूचित होतो आणि हे काम करणारे ते नासत्य. अश्विन् म्हणजे "सकाळी किंवा संध्याकाळी दिसणारा तेजोगोल" हे काही अभ्यासकांचे मत ग्युंटेर्टला स्वीकारार्ह वाटत नाही; कारण सकाळी किंवा संध्याकाळी दिसणारा तेजोगोल सुटा-सुटा एकएकच दिसतो. एकाच वेळी दोन्ही तेजोगोल दिसत नाहीत. अश्विन् मात्र नेहमी एकत्र आढळतात.

अग्नि ही नैसर्गिक घटकाचे दैवतीकरण करून बनलेली देवता आहे. तो ग्रहपति, दूर, क्वचित अशा स्वरूपात वर्णिलेला आहे. अग्निशब्दाचे ग्रीक aggelos ("दूत") ह्या शब्दाशी साम्य आहे; इंग्लिश मधील angel ह्या शब्दाशीही साम्य आहे. नाराशंस, वैश्वानर ह्यांसारखी इतरही अग्नीची रूपे आहेत. ग्युंटेर्टच्या मते मूलतः अग्नि, वरुण आणि सवितृ हे एकच आहेत. त्यामुळेच त्यांची काही अधिविशेषणे समान आहेत.

विष्णु ह्या देवतेची चर्चा करतांना ऋग्वेदात येणारा विष्णूने टाकलेल्या तीन पावलांचा उल्लेख प्रामुख्याने पुढे येणे स्वाभाविक आहे. ह्या तीन पावलांचा विष्णूचे एक भक्तांना मदत करणारे जे रूप आणि त्याबद्दलची अवतारकल्पना ह्यांचा घनिष्ठ संबंध आहे, असे ग्युंटेर्टचे मत आहे. विवाहविधीतील सप्तपदी आणि विष्णूची तीन पावले ह्यांचाही त्याला घनिष्ठ संबंध जाणवतो. सप्तपदीमुळे पति-पत्नींचे नाते दृढ होते, तसेच विष्णूच्या तीन पावलांमुळे तिन्ही लोकांचा संबंध दृढ होतो असे त्याला वाटते. विष्णूची तीन पावले आणि सूर्याचा उदय, मध्य आणि अस्त ह्यांतील साम्यावर तो भर देतो. तसेच



अनुक्रमणिका

ह्या तीन अवस्थांमध्ये विष्णूच्या अवतारकल्पनेचे बीज त्याला दिसते, तसेच विष्णूच्या सर्वोपकारकत्वाचेही मूळ त्यात त्याला दिसते. नंतरच्या काळात विष्णू हा भक्तांचा उद्धार करणारा एक लोकप्रिय देव झालेला असला, तरी त्याचे मूळचे रूप एक लिङ्ग-देवता ह्या प्रकारचे असावेसे त्याला वाटते. शिपिविष्ट हे विष्णूचे एक अधिविशेषण आहे. त्या शब्दातील शिपि शब्दाचा अर्थ पुरुषलिंग आणि विष्ट (विष्-धातु) शब्दाचा अर्थ क्रियाशील; त्यामुळे शिपिविष्ट शब्दाचा अर्थ "क्रियाशील पुरुषलिंग" असा असावा असे त्याचे मत आहे. विष्णूच्या वामन ("बुटका") ह्या अवतारातूनही त्याचे लैंगिक मूळ स्वरूप स्पष्ट होते, असे त्याला वाटते. विष्णु शब्दाची व्युत्पत्ति वि म्हणजे "उडणे" ह्या शब्दापासून नसून ती वि-सानु ("जो पृष्ठभाग दूर करतो") ह्या शब्दापासून असावी अशीही कल्पना त्याने मांडली आहे. विष्णूला निषिक्तपा असे विशेषण जोडले आहे. त्याच प्रमाणे ऋग्वेद (१०. १८४-१) विष्णुर्योनिं कल्पयतु असा मन्त्र आला आहे त्यावरूनही विष्णूचे लिंगरूप स्पष्ट होते, तसाच त्याचा सुफलीकरणाशी असलेला संबंधही स्पष्ट होतो असे त्यांचे मत आहे. विष्णूची मत्स्य, कूर्म ह्यांसारखी रूपे सुद्धा हाच मुद्दा सूचित करतात. पुढील काळातील विष्णूची कृष्णरूपातील रासक्रीडा, तसेच त्याच्याबद्दलचे शृङ्गारिक उल्लेख त्याच्या मूळ रूपावर प्रकाश टाकतात. ह्यासंदर्भात ग्युंटेर्ट ह्यांनी जयदेवाच्या गीतगोविंदाचा संदर्भ दिला आहे. विष्णूचे आणखी एक नाव वृषाकपि असे आहे. त्यातील "कपि" हे सुद्धा एक लैंगिक प्रतीक आहे.

ग्युंटेर्ट ह्यांनी विचारात घेतलेली शेवटची देवता म्हणजे यम. यम शब्दाचा शब्दशः अर्थ "जुळा" असा आहे. यम हा पहिला मर्त्य; तो प्रथम मृत्यु पावला. तो केवळ देव नाही; किंवा केवळ मानवही नाही. तो उभयरूप आहे. त्याबाबतीत त्याची तुलना ऋभु ह्या मूलतः मानव पण नंतर देव बनलेला देवतांशी करता येते. अवेस्ताग्रंथात यमाशी सदृश अशी यिम ही व्यक्तिरेखा आहे. ग्युंटेर्टच्या मते यम तसेच ऋग्वेदातील पुरुषसूक्तात वर्णिलेला विराट् पुरुष ह्या दोहोंमध्येही साम्य असून त्या दोहोंचेही मुख्य रूप द्विलिंगी पुरुष असे आहे. अनेक प्राचीन विचार-सरणींमध्ये सृष्टीची उत्पत्ती अशी द्विलिंगी तत्त्वापासून झाली आहे.

ग्युंटेर्टचे वैदिक दैवतशास्त्रासंबंधीचे प्रस्तुत पुस्तक एखाद्या ज्ञानकोशासारखे आहे. त्यात धर्म, तत्त्वज्ञान, भाषाशास्त्र ह्यांसारख्या विषयातील अनेक संदर्भ येतात. त्यातून ग्युंटेर्ट ह्यांचे विविध विषयातील आणि विविध भाषांतील सूक्ष्म ज्ञान प्रकट होते. जरी काही वेळा ग्युंटेर्ट ह्यांनी दिलेल्या व्युत्पत्ती दूरान्वित वाटतात, तरी त्यांमागील वैचारिक सूत्र पटण्याजोगे असते. ग्युंटेर्ट ह्यांच्या आर्यन् आणि जर्मनिक विचारसरणीवर असलेला भर लक्षात घेण्याजोगा आहे. हिटलरचा उदय होण्यापूर्वी जर्मनीमध्ये सर्व थरांतील विचारवंत "आर्यन्" ह्या विचारपद्धतीने कसे भारावून गेले होते ह्याचा प्रस्तुत पुस्तक वाचतांना अनुभव येतो. पुढे ह्या विचारसरणीचा अतिरेक झाला; हिटलरचा उदय आणि अस्त झाला हा सर्व इतिहास आता प्रसिद्ध आहे. पण तत्पूर्वी विद्याव्यासंगाच्या क्षेत्रातही "आर्य" विचारसरणीने जर्मनीत किती प्रभाव गाजवला होता ते ह्या पुस्तकावरून लक्षात येते. ग्युंटेर्ट इंडो युरोपीय भाषाशास्त्र असा शब्द न वापरता इंडो-जर्मॅनिक असा शब्द वापरतात. ह्यातूनही त्यांची विचारसरणी कशी होती ह्याचा अंदाज येतो. हिटलरच्या पराभवानंतरच्या काळात ग्युंटेर्टसारख्या लेखकांचीही उपेक्षा सुरू झाली. तरी त्यांनी मांडलेल्या विचारांचे आणि त्यांच्या विद्याव्यासंगाचे ऐतिहासिक मूल्य कमी होत नाही. भारतातील संस्कृत-अभ्यासकांच्या जर्मन् भाषेच्या अज्ञानामुळे तर ग्युंटेर्ट ह्यांचे गुण आणि दोष दोन्ही अपरिचितच राहतात. अशा परिस्थितीत ग्युंटेर्ट ह्यांचे विचार थोडेसे तरी परिचित व्हावेत हा प्रस्तुत लेख लिहिण्यामागचा उद्देश आहे. ԾԾԾ

अनुक्रमणिका

# जुने लेखन

पू. गांधीजींनीं सांगितल्याप्रमाणें मी श्री. मगनलालजी यांच्याकडे गेलों व त्यांना 'मलाही कांहींतरी काम देण्यास गांधीजींनीं सांगितलें आहे' असें म्हटलें. त्यांनीं मला आपल्याबरोबरच तसेंच बोलत बोलत नेलें. वाटेंत नांव, गांव, चंपारण्याची थोडीशी माहिती मला ते विचारीत होते. 'सकाळचा नाश्ता घेतला काय? स्नान झालें काय?' असे प्रश्न विचारले. आम्ही बोलत बोलत ओळींने दहा पायखाने असलेल्या ब्लॉकजवळ येऊन उभे राहिलों. ते सर्व उघडून दाखवून श्री. मगनलालजी मला म्हणाले कीं, 'एवढे आठ दहा पायखाने साफ करण्याचें काम तुम्हीं हातीं घ्या.' 'पायखाना साफ कसा करावा,' पुढें ते मला म्हणाले, 'हें तुम्हांला माहीत नसेल. म्हणून मी सांगतों त्याकडे लक्ष द्या.' (मी त्यांच्या तोंडाकडे न पाहतांच ऐकून घेत होतों.) 'हे पायखाने नवीन पद्धतीचे आहेत. आंत एका पेटीमध्यें किंवा खोक्यामध्यें माती ठेवलेली असते. खालीं दोन बालड्या असतात. एकीमध्यें मल पाडावयाचा आणि दुस-या बालडीमध्यें मूत्र पाडावयाचें. मूत्राचे शिंतोडे अंगावर उडूं नयेत, म्हणून पुढच्या बालडीवर एक खोलगट, मध्यें भोंक असलेली पत्र्याची तबकडी ठेवलेली असते. मल व मूत्र आणि आपण उपयोग करीत असलेलें पाणी यांचें एकत्रीकरण झालें म्हणजे घाण फार होते आणि साफ करण्यासही त्रास व किळस येते. शौचविधि झाल्यानंतर मलावर खोक्यांतील माती घालावयाची म्हणजे वास कांहींच येत नाहीं. मूत्राच्या बालडीमध्यें मात्र माती घालावयाची नाहीं. त्या बालडींत शौचानंतरचें सांडपाणी पडत असल्यानें लघवीची घाण वर येत नाहीं. दोन्ही बालड्या ठेवलेली जागा रोजच्या रोज धुवून काढली पाहिजे. पायखान्याची खोली देखील एक बालडी पाणी ओतून झाडून काढीत असावें. प्रत्येक पायखान्यांतील दोन्ही बालड्या रोज घासून स्वच्छ केल्या पाहिजेत. पायखान्यांतील पेटीमध्यें माती पुरेशी आहे किंवा नाही याकडे लक्ष असावें. पायखान्याभोंवतीची जागा एक दिवसाआड झाडली तरी चालते. पायखान्यांतील मल व मूत्र त्या जागेंत (अंगुलिनिर्देशानें ती जागा दाखवीत ते म्हणाले) थोडासा खोल खड्डा काढून त्यांत घालून वर माती घालावी. एक खड्डा या आठ-दहा पायखान्यांना चार दिवस पुरूं शकतो. तो खड्डा किती रुंद व किती खोल काढाल त्यावरच अवलंबून असणार. पूर्वीची जी जागा अशा खड्ड्यासाठीं वापरलेली आहे तीच पुन्हां उकरली जाऊं नये यासाठीं कांहींतरी खूण करून ठेवावी.' असें सांगून मगनलालजी आपल्या कामाला झपाझप पावलें टाकीत जाऊं लागले.

'पण हें काम मीं आजपासूनच करावयाचें कीं उद्यांपासून?' मीं त्यांच्याबरोबर पळत पळत जात असतांना विचारलें.

'आजचें काम झालेलें आहे. उद्यांपासून करा. हल्लीं हें काम कोण कोण करीत होते त्यांना शोधून काढा व त्यांच्याकडून अधिकची माहिती घ्या.' 'आज मला मग कांहींच काम नाहीं?' मीं अधिक खात्री करून घेण्याच्या हेतूनें विचारलें. तों झटकन ते बोलून गेले कीं, 'मी सर्व आश्रमांतील कामांतून फेरी मारीत आहें. वाटल्यास माझ्याबरोबर हिंडा.' विणकामाचे माग, सुताचें कोठार, चरखा कारखाना, पुस्तकालय, ऑफीस, स्वयंपाकगृह या सर्व ठिकाणी ही स्वारी फिरली. 'घोडें ओझ्यानें मेलें आणि शिंगरूं येरझा-यानें मेलें' असें म्हणतात ना, तशी माझी स्थिती झाली होती. विणकामामध्यें सर्व मागांजवळ मिनिट दोन मिनिटें ते उभे राहिले. छोटेलालजींना कांहीं सूचना दिल्या.

छोटेलालजी त्या भागाचे व्यवस्थापक असले, तरी त्यांना स्वतःला एक माग घालून दिलाच होता. फावल्या वेळीं तेही आपल्या मागावर विणत असत. सुताच्या कोठारांत गेले व तें कसें रचून ठेवावें हें स्वतः काम करून तेथील लोकांना त्यांनीं सूत रचून दाखविलें. लाजेनें मींही तेथें असेतोंपर्यत त्या कामाला थोडासा हातभार

लाविला. चरखा कारखान्यांत ते गेले. तेथें स्वतः सुतारी काम करावयास बसले; कारण त्या वेळीं त्यांचे स्वतःचे असे कांहीं तरी चरख्यावर प्रयोग चाललेले होतेच. विणकामाला त्या वेळी गिरणीचें सूत वापरीत असत. तेवढी उणीव त्यांना भरून काढावयाची होती. पुस्तकालयांत छोटालालजींना ते घेऊन गेले व तीं सर्व पुस्तकें झाडून पुसून ठेवावयास त्यांना सांगितले आणि 'या कामीं पुंडलीकजी – कारण आजच्या दिवस ते मोकळेच आहेत – तुम्हांला मदत करतील' असेंही त्यांनी सांगून टाकिलें आणि शेवटी स्वयंपाकघरांत गेले व तेथें हातपाय धुवून फुलक्या लाटण्यास बसले.

मी पू. काकासाहेबांच्या बरोबर त्यांच्याच घरीं गेलों व माझ्या खोलीमध्ये अथंरुणावर स्वस्थ बसून विचार करूं लागलों. 'देशभक्तींमध्यें माझ्याच नशिबीं हें भंग्याचें काम कोठून आलें? यांत मला कोणतें शिक्षण मिळणार आहे? यांनी सांगितलेलें सर्व काम रोज करावयाचें म्हणजे निदान चार तास तरी खर्च करावे लागतील. त्यांतल्या त्यांत आपले गांवचें तरी येथें कोणी नाहीं, ही समाधानाची गोष्ट आहे. पण कांहीं झालें तरी यांच्या परीक्षेमध्यें नापास होऊन बेळगांवास जाणें योग्य होणार नाहीं. दे. भ. गंगाधररावांच्या कडून आलेल्या मनुष्याला असें वागविणें हें या व्यवस्थापकाला शोभतें काय? गांधीजींना काय? त्यांना पुष्कळ कामें! असल्या क्षुल्लक कामाकडे लक्ष देण्यास त्यांना सवड तरी कशी मिळणार?' असे एक ना दोन, शेकडों विचार मनामध्यें येऊन गेले. पण त्याचा उपयोग काय?

मला हें काम दिलें गेलें असल्याबद्दल मीं पू. श्री. काकासाहेब कालेलकर यांच्याकडे सहज बोलून पाहिलें; पण ते मला म्हणाले कीं, 'तुमच्या अंगावर पडेल तें व येईल तसलें काम मनःपूर्वक करून दाखवावें.'

दुस-या दिवसापासून मीं या पायखान्याच्या कामास प्रारंभ केला. हें काम सकाळी आठ वाजतां सुरू व्हावयाचें तें दहा वाजतां संपत असे. खड्डे खणणें व संडासामधील खोक्यांमधून माती भरणें हीं कामें दोनप्रहरीं व्हावयाचीं. त्याला अर्धा पाऊण तास लागत असे. पहिल्या दिवशीं हें काम झाल्यानंतर साबरमती नदी पोहून पलीकडे मी गेलों व तेथें रडत बसलों. परंतु रडण्यासही सवड नव्हती. कारण, नाहीं तर भोजनाला जाण्याची वेळ चुकावयाची! कितीही साबण लावून हात धुतले तरी हाताला दुर्गंधी येत असल्याची उगाचाच शंका यावयाची. म्हणून भात व डाळ चमच्यानें खाण्यास प्रारंभ केला. एक-दोन दिवस गेल्यानंतर अर्थात् ही भावना थोडी कमी होऊं लागली.

तिस-या दिवशीं माझें काम संपतें न संपतें तोंच श्री. मगनलालजी माझें काम पहाण्यास संडासाजवळ हजर! बालड्या उचलून त्यांनीं त्यांचा वास घेऊन पाहिला. सर्व संडासांमध्ये हिंडून पाहिलें आणि एका संडासामध्येंच उभे राहून तेथील मलाची बालडी हातांत घेऊन मला ते म्हणाले कीं, 'उत्तम काम झालें आहे. पण कांहीं गोष्टींकडे यापेक्षां अधिक लक्ष द्यावयास पाहिजे. बालडीला वासही न येईल अशी खटपट केली पाहिजे. वाळूनें आणि आपल्या हातांत गवत धरून बालडी जरा नेटानें दाबून घासावी आणि स्वच्छ झाल्यानंतर पुन्हां त्यांत नवीन माती तळाला पसरून मगच बालडी ठेवावी. संडासाच्या आंतील भागांत कोप-यांतून केर दडून बसलेला असतो. त्याला तेथून हुसकावा आणि खोक्यामध्यें माती भरत असतांना ती खालीं पडते तीही झाडून काढावी. किंवा संडास झाडण्यापूर्वी प्रथम माती भरण्याचेंच काम करावें आणि संडासामध्यें जाऊन आल्यानंतर मलावर माती घालण्यास कोणी विसरत असेल तर त्याचें स्मरण ठेवून माती घालण्यास त्यांना सायंकाळच्या प्रार्थनेनंतर तेथेंच सांगावें. कारण आपण तेथेंच सर्वांना एकत्रित भेटू शकतो. शिवाय कोण माती घालण्यास विसरले आहेत हें आपल्याला समजलें नसलें तरी सर्वसामान्यपणेंही आपण तेथें तसें सांगू शकतों आणि हें पहा, दोनप्रहरीं एखादे वेळीं संडासाकडे फेरी मारून कोणी मलावर माती घालण्यास विसरून गेलें असल्यास आपण स्वतःच माती घालून जावें. बाकी आपलें काम उत्तम आहे.' असें सांगून ते निघून गेले. चार पांच दिवसांनंतर फिरावयास गेल्यावेळीं पू. बापूजींनीं मला विचारीलें कीं, 'तुम्ही कोणतें काम करतां?'

'पायखाने साफ करण्याचें.' मीं खालीं पहातच त्यांना उत्तर दिलें. 'सौभाग्य की बात है.' गांधीजी उदारले. मीं 'हूं' सुद्धां म्हटलें नाहीं. पण तेच पुढें म्हणूं लागले कीं,








'समाजांची केवढी सेवा आपले भंगी बंधु करीत असतात! आणि समाज त्यांनाच अस्पृश्य मानतो. तें काम घाण किंवा ओंगळपणानें होत असेल तर त्यांत आपण सुधारणा केली पाहिजे.'

'हें मात्र मला पटतें.' मी मध्येंच बोलून गेलों आणि 'हें काम मीं किती दिवस करावयाचें आहे?' मीं विचारलें. 'फार नाहीं; एक जन्म' हे गांधीजींचे शब्द ऐकतांच मी हादरूनच गेलों. मला वाटलें कीं मी भंग्याचे पोटीं जन्माला आल्यासारखें झालें निदान मी या आश्रमांत असेपर्यंत तरी मला याच कामांत रहावें लागणार; पण बोलावयाचें कोणाजवळ?

पुन्हां पुढें चार-सहा दिवस गेल्यानंतर गांधीजींनींच मला विचारीलें कीं, 'कसें काय चाललें आहे तुमचें काम?'

'आतां ठीक आहे. इतका वास किंवा किळसही येत नाहीं.' मीं समाधानानें उत्तर दिलें. फिरणें संपून अगदीं आश्रमापाशीं आल्यानंतर आम्ही आपापल्या घरीं खोलीकडे जाण्याच्या वेळीं गांधीजी मला म्हणाले कीं, 'उद्यां काम बदलून घ्या. आतां दुस-या कामाचा अनुभव.' या त्यांच्या बोलण्यानें मला बरें वाटलें असलें तरी आतां उद्यां दुसरें कोणतें काम येतें कोणास ठाऊक या चिंतेमध्यें मीं रात्र घालविली. दुसरे दिवशीं पहांटे प्रार्थना संपतांच श्री. मगनलालजींनीं म्हटलें कीं, 'आश्रमांत पाणी भरण्याचें काम आजपासून पुंडलीकजी करतील.' मला वाटलें कीं संडासाचें काम असून शिवाय या कामाची त्यांत भर तर पडली नाहीं ना! 'माझ्याकडे संडास साफ करण्याचें काम आहे' असें मीं तेथेंच त्यांना सांगितलें व उत्तराची अपेक्षा करीत थोडा वेळ थांबलों.

'तें काम आतां दुसरे करतील.' मगनलालजी म्हणाले.

'मीं एकंदर चौदा दिवस हें संडास साफ करण्याचें काम केलें असेल. हा अनुभव आतां मला मौल्यवान वाटतो.'

**आश्रमांतील पाणी भरण्याचें काम** :

श्री. मगनलालजींनीं मला आश्रमांत दोन तीन ठिकाणीं हिंडवून कोठें कोठें व किती पाणी भरावयाचें तें दाखविलें. पाणी भरावयाची भांडीं रोज आंतून बाहेरून घासावयाची असत. त्याचबरोबर इमामसाहेब-आफ्रिकेंत गांधीजींच्याबरोबर असलेले त्यांचे सहकारी – यांच्या बि-हाडींही मला पाणी भरावयाचें असे. रसोडा-स्वयंपाकगृहामध्यें एक पंचवीस-तीस घागरींचा मोठा हंडा होता. तोही रोज सकाळीं घासावयाचा असे. सबंध दिवसामध्यें सर्व मिळून चाळीस-पंचेचाळीस पोहरे पाणी लागत असे. हें सर्व पाणी विहिरींतून रहाटावरून ओढावें लागत असे. हें सर्व काम मी अगदीं चोख व कांहींही आळस न करतां करीत असे. एकदां त्याबद्दल मगनलालजींनीं माझी वाहवा देखील केली. पण एके दिवशीं मला वाटलें कीं, 'मोठा हंडा रोज कशाला घासावयास पाहिजे? बाहेरून अगदीं लखलखीत करून आंतून एक दिवस नाहीं घासला म्हणून काय होतें? पाणी तुडुंब भरल्यानंतर आज तो हंडा आंतून घासला आहे किंवा नाहीं मगनलालजींना कसें कळणार?' पण त्याच दिवशीं अगदीं भोजनाच्या वेळीं मगनलालजी त्या हंड्याजवळ आले व मला त्यांनीं विचारलें कीं, 'हा हंडा बाहेरून इतका सुंदर घासला आहे, तसाच आज आंतून घासलेला आहे ना?'

'त्यांत थोडेंसें पाणी शिल्लक होतें आणि म्हणून मीं आंतील बाजू न घासतां त्या पाण्याचाही उपयोग करून घेतला आहे.' खोटें बोलावें कीं खरें सांगावें याचा विचार करीत करीत ती वस्तुस्थिती सांगून मोकळा झालों.

'तें सर्व पाणी ओतून टाकून तो हंडा आंतून घासा व नंतर तो पुन्हां भरा.' श्री. मगनलालजी म्हणाले.

मग मात्र मला चीड आली. मी लागलीच गांधीजींच्याकडे गेलों व त्यांच्याकडे तक्रार केली. सर्व हकीकत त्यांना सांगितली व म्हटलें कीं, 'हे मगनलालजी भारी त्रास देतात. एखाद्याला किती छळावयाचें?'

'त्यांतील पाणी स्वयंपाकाला घेतात ना? आतांपुरतें एक-दोन डोल पाणी ताजें त्यांना आणून द्या आणि भोजन वगैरे झाल्यानंतर सावकाशीनें तो हंडा धुऊन पाणी भरा. तोपर्यंत अर्धा हंडा तरी खपून जाईल आणि भरावयाचा तोही अर्धाच भरा. उद्यां सकाळपर्यंत पाणी पुरलें म्हणजे झालें. भोजन झाल्यानंतर भांडी घासण्यासाठीं त्याच हंड्यांतील पाण्याचा उपयोग करण्यास सर्वांना सांगावें म्हणजे त्यांतील बरेंचसें पाणी संपूनही जाईल.'

गांधीजी म्हणाले.

मीं रागारागानें तें सर्व पाणी टाकून दिलें व पुन्हां तो हंडा भरून ठेवण्याचें ठरविलें. परंतु, हंडा अगदीं भरत भरत आला होता त्यावेळीं माझा क्रोध कमी झाला होता; म्हणून शेवटच्या दोन-तीन घागरी कमीच घातल्या होत्या.

इमामसाहेबांच्या घरींही पाणी भरावयास मी जात असल्यामुळें माझा त्यांचा पुष्कळच परिचय झाला होता. त्यांची पत्नी, दोन मुली व ते इतकीच मंडळी त्यांच्या कुटूंबांत होती. त्यांची मुलगी अमीना नेहमीं उद्योगामध्यें असावयाची. इमामसाहेब हे गांधीजींचे दक्षिण आफ्रिकेंतील सहकारी होते. त्यांचा स्वभाव अत्यंत शांत होता. गांधींच्या वाढदिवशीं सायंकाळी गांधीजींच्या समक्ष गांधीजींच्या आयुरारोग्याबद्दल ईश्वराची प्रार्थना करण्यांत आली. प्रार्थनेनंतर कांहीं मंडळींचीं छोटीं छोटीं भाषणेंही झालीं. त्यांत इमामसाहेबांनीं ईश्वराची प्रार्थना करून 'गांधीजींची आपल्या सत्य-अहिंसा आदि तत्त्वांवरील श्रद्धा कायम राहूं दे' अशी मागणी ईश्वरापाशीं केली होती.

हें पाणी ओढण्याचें काम माझ्या इतकें अंगवळणीं पडलें होतें कीं पन्नास-साठ पोहरे पाणी ओढणें मला अगदीं हातचा मळ झाला होता. मात्र हें श्रमाचें काम असल्यामुळें भूक खूपच लागत असे. भातापेक्षां गुजराथी फुलके खाणेंच मला आवडत असे. मी व मणींद्रमाई आम्ही दोघेही फुलके पुष्कळच खात होतों. फुलके करण्यास इतरांना श्रम करावे लागतात तसें भाताचें नाहीं. 'फुलक्यांपेक्षां भात खा' अशी सूचना श्री. मगनलालजींनीं आम्हां दोघांना केली. आम्हीं दोघांनींही त्यांना कांहींही उत्तर दिलें नाही. पण आपला भोजनांतील फुलकेच खाण्याचा नित्यक्रम पूर्ववत्च चालू राखला. शेवटीं मगनललाजींनीं ही तक्रार पू. गांधीजींपर्यंतही नेली. एके दिवशीं प्रार्थना झाल्यानंतर पू. गांधीजींनीं स्वतःच सर्वांसमक्ष आम्हांला त्याविषयीं विचारलें. माझें काम आणि महाराष्ट्रांतील लोकांचा आहार याविषयींची माहिती सांगून मीं म्हटलें कीं, 'मला भात अधिक खाववत नाहीं. पण कधीं कधीं वाटतें कीं तुपाशिवाय अधिक फुलक्या खाणें योग्य होईल काय?'

'फुलक्या चांगल्या चावून खाल्या जातील तर कमी लागतील आणि तितके इतरांचे श्रम वांचतील' असा युक्तिवाद मगनलालजींचा होता. पण गांधींजींनीं 'त्यांना फुलक्याच अधिक लागत असतील, तर त्या मानानें त्यांना तूपही अधिक वाढलें जावें' असाच निर्णय दिला.

हें पाणी ओढण्याचें काम जवळ-जवळ मीं एक महिना केलें असावें, त्यानंतर मला दळण्याचें काम देण्यांत आलें.

पुंडलीकजी कातगडे यांच्या 'पुंडलीक' या आत्मचरित्रातून : (१९५०)

**टिपा** :

१) पुंडलीकजी कातगडे – कर्नाटकसिंह गंगाधरराव देशपांडे (बेळगाव) यांचे निष्ठावंत स्वयंसेवक.

२) काकासाहेब कालेलकर – गांधीजींचे निकटचे अनुयायी व मराठीतील शैलीदार लेखक.

३) मगनलाल पटेल – साबरमती आगमाचे व्यवस्थापक.

४) मणींद्रभाई – रवींद्रनाथ टागोरांचे विद्यार्थी व साबरमती आश्रमातील एक सदस्य.

अनुक्रमणिका






## लेखकांचा परिचय

**मुखपृष्ठावरील चित्र :**
**चित्रकार -** जितेंद्र लक्ष्मण साळुंखे,
**पत्ता :-** मल्हारपुरा, मूक-बधिर विद्यालयामागे, चोपडा, जिल्हा जळगाव - ४२५ १०७.
भ्रमणध्वनी : ९९७०७८३४०५.

**किशोर सिताराम बेडकिहाळ**
गेली अनेक वर्षे विविध महाविद्यालयात १ दिवसीय शिबिरांचे आयोजन व सहभाग, पुणे, शिवाजी, उत्तरमहाराष्ट्र विद्यापीठातील चर्चासत्रात सहभाग व प्राध्यापक प्रशिक्षण शिबिरात व्याख्याने, वसंत व्याख्यानमाला पुणे, छ. शाहू व्याख्यानमाला कोल्हापूर, कॉ. अवि पानसरे व्याख्यानमाला कोल्हापूर, सांगली, वर्धा, येथील व्याख्यानमालेत व इतरत्र व्याख्याने तसेच विविध विषयातील लेखन व संपादनासाठी पुरस्कार प्राप्त.
**पत्ता**:- 'मैत्री' १२० ब/२/१ यादोगोपाळ पेठ, सातारा ४१५ ००२. भ्रमणध्वनी : ९४२३०१२८७७.

**प्रा. डॉ. अशोक कृष्णाजी जोशी**
इंग्रजी या विषयाचे प्राध्यापक (निवृत्त.) गोवा विद्यापीठ. सौंदर्यशास्त्र, समीक्षा, तत्त्वज्ञान या विषयांचे अभ्यासक.
**पत्ता**:- बी १ व्यंकटेश रिव्हिएरा, शाहू कॉलनी, गल्ली नं.२, कर्वेनगर, पुणे ४११ ०५२
भ्रमणध्वनी : ९४२२०६४९७५.

**श्री. के. वनपाल**
श्री. वनपाल यांनी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची परीक्षा देऊन मामलेदार म्हणून नोकरीस सुरुवात केली व पदोन्नती मिळवत ते महसूल खात्याच्या सचिव पदावरून निवृत्त झाले. शेती, शेतकरी व त्यांचे अर्थकारण याची त्यांना तृणमूल स्तरावरून माहिती आहे.
***पत्ता :–*** अ-८, रे-व्हेन्यू को. ऑ. हाऊसिंग सोसायटी, गणेशखिंड रस्ता, आय्-सी-एस् कॉलनी. पुणे ४११ ००७. मो. ९९२२५०१४६४.

**गणेश उमाकांत थिटे**
सेवानिवृत्त संस्कृत विभाग प्रमुख, प्राध्यापक संस्कृत विभाग, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ.
***पत्ता :*** २१, एरंडवणा, गावठाण, मेहेंदळे गॅरेज जवळ, पुणे-४११ ००४ मो. ९८२२९१२०८१.

अनुक्रमणिका

## आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ७० वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदानप्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे, असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता'ने पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयांतील ग्रंथालयात अद्ययावत पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील, असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयांतून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांनी आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल, त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रु. ४००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

—gSmXH$_S>i

## लेखकांस आवाहन

'नवभारत'मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण 'नवभारता'कडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी, अशी विनंती आहे.

१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.

२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील, ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यांसह द्यावेत.

३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही, याची स्पष्ट कल्पना 'नवभारत'च्या संपादकांना द्यावी.

४. 'नवभारत'मध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो. त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात 'नवभारत'मध्ये येईल किंवा येणार नाही, हे यथावकाश कळविले जाईल, याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.

आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.

– संपादक मंडळ

अनुक्रमणिका

हे मासिक प्रा. यशवंत कळमकर यांनी सन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका